


नोंदणी क्रं. एफ.१६०९४(मुंबई)





महाराष्ट्र शासन
मराठी भाषा विभाग
**राज्य मराठी विकास संस्था**
एल्फिन्स्टन तांत्रिक विद्यालय, ३, महापालिका मार्ग,
धोबीतलाव, मुंबई - ४००००१ दूरध्वनी : (०२२) २२६३१३२५ / २२६५३९६६
संकेतस्थळ https://rmvs.marathi.gov.in इ-पत्ता rmvs_mumbai@yahoo.com

# निवेदन

महाराष्ट्र राज्याचे सांस्कृतिक धोरण २०१० अंतर्गत मराठी भाषेतील प्रतिमुद्राधिकाराची (कॉपीराइटची) मुदत संपलेले दुर्मिळ ग्रंथ महाजालावर उपलब्ध करून द्यावे असे म्हटले आहे. त्यानुसार मराठी भाषा विभागाच्या आदेशाप्रमाणे (शासननिर्णय क्र. रासांधो १०१२/ प्र. क./२०१२/भाषा-३ दि. २८ मार्च २०१३) राज्य मराठी विकास संस्थेद्वारे असे ग्रंथ आणि नियतकालिके महाजालावर उपलब्ध करून देण्याचा प्रकल्प राबवण्यात येत आहे. त्याच बरोबर प्रतिमुद्राधिकाराच्या कक्षेत येणारी काही साधनेही प्रतिमुद्राधिकारधारकांची उचित अनुमती प्राप्त झाल्यास संस्थेद्वारे संगणकीकृत करून अभ्यासकांसाठी उपलब्ध करून देण्यात येत असतात.

सदर प्रकल्पांतर्गत महाराष्ट्र साहित्य परिषद, पुणे ह्या संस्थेद्वारे प्रकाशित करण्यात येणाऱ्या महाराष्ट्र साहित्य पत्रिका ह्या नियतकालिकाच्या अंकांचे संगणकीकरण करून ते सार्वजनिकरीत्या आणि विनामूल्य उपलब्ध करून देण्यासंदर्भात उपरोक्त संस्थेला आवाहनपर विनंती करण्यात आली होती.

सदर विनंती मान्य करून महाराष्ट्र साहित्य परिषदेद्वारे सदर अंक संगणकीकरणासाठी उपलब्ध करून देण्यात आले. हे अंक सदर संस्थेच्या सहकार्यामुळेच आपल्याला संगणकीय स्वरूपात उपलब्ध होत आहेत.

या अंकांच्या पीडीएफ प्रती आपण विनामूल्य उतरवून घेऊ शकता. असे करताना खालील सूचना लक्षात घेऊन त्यांचे पालन करावे.

१. सदर ग्रंथांच्या पीडीएफ प्रती या वैयक्तिक वापरासाठी विनामूल्य उतरवून घेता येतील तसेच इतरांनाही विनामूल्य देता येतील. पण कोणत्याही कारणासाठी त्याचा व्यावसायिक वापर करता येणार नाही.
२. सदर ग्रंथांचे दुवे इतरांना देताना त्यासाठी कोणतीही रक्कम आकारता येणार नाही.
३. पीडीएफ प्रतींवर असलेली राज्य मराठी विकास संस्था, मुंबई व महाराष्ट्र साहित्य परिषद, पुणे यांची मुद्रा आपणास काढता येणार नाही.
४. आपल्या अभ्यासासाठी, संशोधनासाठी या सामग्रीचा उपयोग करताना आपण योग्य तो श्रेयनिर्देश केला पाहिजे.

वरील अटींचा भंग झालेला आढळल्यास कायदेशीर कारवाई करण्यात येईल.

स्पष्टीकरण : सदर सामग्री ही केवळ ऐतिहासिक दस्तऐवज म्हणून उपलब्ध करण्यात आली असून या सामग्रीतून व्यक्त होणारी मते, विचारसरणी इ. त्या त्या लेखक, संपादक इ. कर्त्यांची आहे. त्यांपैकी कोणतेही मत, विचारसरणी इ. यांचा पुरस्कार महाराष्ट्र शासन, मराठी भाषा विभाग, राज्य मराठी विकास संस्था व महाराष्ट्र साहित्य परिषद, पुणे यांपैकी कुणीही करत नसून त्या त्या मताचे वा विचारसरणीचे दायित्व उपरोक्त विभागांवर/ संस्थांवर असणार नाही.

सदर अंक केवळ अभ्यासकांच्या सोयीसाठी संगणकीय स्वरूपात उपलब्ध करण्यात येत असून अंकांतील सामग्रीचे (लेखन, मांडणी, छायाचित्रे, रेखाचित्रे इ.) प्रतिमुद्राधिकार त्या त्या लेखकांकडे अथवा प्रकाशकांनी त्या त्या वेळी केलेल्या व्यवस्थेनुसार आहेत ह्याची नोंद घेण्यात यावी. त्या सामग्रीसंदर्भातील कोणतेही अधिकार वा दायित्वे राज्य मराठी विकास संस्था, मराठी भाषा विभाग किंवा महाराष्ट्र शासन ह्यांच्याकडे असणार नाहीत.

अनुक्रमणिका








८।२५ २६८८

अं· २५·२६·२८·२९

वर्ष ७ वे जानेवारी १९३४ अंक १ ला
वर्ष ७ वे एप्रिल १९३४ अंक २ रा / ३ रा नाही
" " ऑक्टोबर १९३४ अंक ४ था
" " जानेवारी १९३५ अंक ५ वा

~~वर्ष ७वे जुलै १९३४ अंक ३ रा नाही.~~



॥ श्री ॥






महाराष्ट्र साहित्य परिषदेचें त्रैमासिक

# महाराष्ट्र साहित्य-पत्रिका

वर्ष सातवें ] पौष शके १८५५ [ अंक पहिला

जानेवारी १९३४



संपादक

प्रो. दत्तो वामन पोतदार, बी. ए.



वार्षिक वर्गणी ट. ह. सह रु. ४-८ फुटकळ अंकास १ रु. ट. ख. निराळा

अनुक्रमणिका



# महाराष्ट्र-साहित्य-परिषद्

## अधिकारी व अधिकारी मंडळें

### ट्रस्टी

प्रो. दामोदर गणेश पाध्ये, एम्. ए., जे. पी., एच्. पी. टी. कॉलेज, नाशिक.
डॉ. नी. भा. भाटवडेकर, एम्. बी. बी. एस्., चर्नी रोड, मुंबई ( ४ ).

### अध्यक्ष

श्रीमंत सरदार माधवराव विनायक किबे, एम्. ए., सरस्वतीनिकेतन, इन्दूर.

### उपाध्यक्ष

प्रो. वामन मल्हार जोशी, एम्. ए., हिंगणें बुद्रुक, पुणें ( ४ ).
श्री. नरसिंह चिंतामण केळकर, बी. ए., एल्एल्. बी., टिळक रस्ता, पुणें ( २ ).
प्रो. पांडुरंग वामन काणे, एम्.ए., एल्एल्.एम्., आंग्रेवाडी, गिरगांव बॅक रोड, मुंबई(४).
श्री. चिंतामण विनायक वैद्य, एम्.ए., एल्एल्. बी., गिरगांव बॅक रोड, मुंबई (४).
श्री. श्रीपाद कृष्ण कोल्हटकर, बी. ए., एल्एल्. बी., जळगांव (वऱ्हाड).

## कार्यकारी मंडळ

### कार्याध्यक्ष

रा. सा. नारायण गोविंद चापेकर, बी. ए., एल्एल्. बी., बदलापूर ( जि. ठाणें ).

### खजिनदार

प्रि. धनंजय रामचंद्र गाडगीळ, एम्. ए., एम्. लिट्., डेक्कन जिमखाना, पुणें ( ४ )

### चिटणीस

प्रो. देविदास दत्तात्रेय वाडेकर, एम्. ए., फर्ग्युसन कॉलेज, पुणें ( ४ ).
श्री. राजाराम दामोदर देसाई, बी. ए., ३१३ सदाशिव पेठ, पुणें ( २ ).

### ' म. सा. पत्रिका ' संपादक

प्रो. दत्तो वामन पोतदार, बी. ए., सर परशुरामभाऊ कॉलेज, पुणें ( २ ).

### सामान्य सदस्य

प्रो. शंकर दामोदर पेंडसे, एम्. ए., एम्. ओ. एल्., हिस्लॉप कॉलेज, नागपूर.
श्री. कृष्णाजी पांडुरंग कुलकर्णी, एम्. ए., बी. टी., मंगळवार पेठ, सातारा.
श्री. चिंतामण गणेश कर्वे, बी. ए., महाराष्ट्र शब्दकोश कचेरी, पुणें ( २ ).
रे. भास्कर कृष्ण उजगरे, सासवड ( जि. पुणें ).
श्री. केशव नारायण काळे, बी.ए.,एल्एल्. बी., 'प्रतिभा' कचेरी, गिरगांव, मुंबई (४).

प्राथमिक व दुय्यम शाळांतील वाचनालयांकरिता मुंबई सरकारने मंजूर केलेलें

# महाराष्ट्र साहित्य पत्रिका

वर्ष ७ वें, अंक १ ला

## अनुक्रमणिका

# सामार स्वीकार

खालील ग्रंथ पत्रिकेकडे अभिप्रायार्थ आले आहेत. त्याबद्दल आम्ही आभारी आहों. सदर ग्रंथांवर म. सा. पत्रिकेंत यथावकाश अभिप्राय देण्यांत येतील.—संपादक

१ **भाग्योदय**—लेखक, प्रो. जनार्दनमूर्ति, मु. अकेरी, सावंतवाडी. प्रकाशक—द्वारकानाथ पांडुरंग रेगे. किं. ६ आणे.

२ **अस्पृष्टांचा प्रश्न**—लेखक, श्री. श्रीपाद महादेव माटे, पुणें. प्रकाशक—श्री. शंकर रामचंद्र दाते, लोकसंग्रह छापखाना, पुणें. किं. २ रु.

३ **विनोद निर्जल अर्थात् विनोदी कळ्या**—लेखक, वि. वा. जोशी; मूल. प्रकाशक—के. र. काशीकर, बाल वाङ्मय प्रसारक मंडळ, सांगली.

४ **व्यवहारोपयोगी कानडी भाषामाला**—( भाग १ ) लेखक व प्रकाशक—गोपालकृष्ण त्र्यंबक गोडबोले, १९९ ( २ ) टिळकरोड, पुणें २. किं. २॥ आणे.

५ **इंग्रजी मराठी वाचनमाला**—( भाग १ ), लेखक व प्रकाशक—टी. एन्. गोडबोले, १९९ ( २ ) सदाशिव पेठ, पुणें २.

६ **कार्ल मार्क्स**—( चरित्र व शिकवण ). लेखक व प्रकाशक—श्री. विनायक महादेव सुरकुटे, १९६ ( ५० ) सदाशिव पेठ पुणें २. किं. १॥ रु.

७ **अपोलो बंदरावर**—लेखक, अ. तु. वाळके, उमरावती. प्रकाशक—प. वि. जोशी, सोमेश्वर प्रिंटिंग प्रेस, उमरावती, किं. १ रु.

८ **तडफ**—[ कवितासंग्रह ] प्रकाशक—किर्लोस्कर प्रेस, किर्लोस्करवाडी, जि. सातारा. किं. ८ आणे.

९ **मंडळांतील नाणीं**—लेखक, ग. ह. खरे. प्रकाशक—चिटणीस, भा. इ. सं. मंडळ, पुणें. किं. १ रु.

१० **निवडक भाषणें**—लेखक, द. व्यं. पै, मडगांव (गोवें). किं. ८ आणे.

---

## अगत्याची सूचना

म. सा. परिषदेचें चालू वर्ष, नव्या वर्षगणनेशीं मेळ घालण्याकरिता ( घटना नि. २ ) **जानेवारी १९३४ ते मार्च १९३५ असें १५ महिन्यांचें** धरावें लागत असून यामध्ये पत्रिकेचे ५ अंक काढावयाचे आहेत. अर्थात् या वर्षाची वर्गणी नेहमीच्या वर्गणीच्या सव्वापट म्हणजे **सभासदांना रु. ४।≈ व वर्गणीदारांना ५॥** द्यावी लागेल. ही योजना पूर्वीच जाहीर झालेली आहे. तरी वरीलप्रमाणे रे. [illegible]विषयी विनंति [illegible]

श्री. केशव नारायण काळे, बी.ए.,एल्एल्. बी., 'प्रतिभा'कचेरी, गिरगांव, मुंबई (४)

# ' गोमन्तक '

(लेखक—पांडुरंग वामन काणे, मुंबई.)

ह्या विषयावर साहित्यपत्रिका वर्ष ३ अंक २ ( पान १३९–१४४ ) मध्ये मी एक लेख लिहिला. त्या सहा पानांच्या लेखाविरुद्ध रा. शणै गोंयबाब् यांनी विविधज्ञानविस्तार वर्ष ६२ ( पान १–१९ ) मध्ये एकोणीस पानांचें उत्तर दिलें. त्या उत्तराची चर्चा मी साहित्यपत्रिका वर्ष ४ ( पान ९३–१०५ ) मध्ये तेरा पानांत केली. त्याला प्रत्युत्तर म्हणून रा. शणै गोंयबाब् यांनी पुनः विविधज्ञानविस्तार वर्ष ६४ ( पान १८१–१९८ ) मध्ये लेख लिहिला आहे. एतावता या लहानशा विषयावर ५६ पानें लिखाण झालें आहे. मी आपल्या दुसऱ्या लेखांतच म्हटलें आहे कीं, मूळ दोन्ही लेख वाचून वाचकांनी आपआपलें मत ठरवावें. तेंच मी पुनः म्हणतों. 'गोमन्तक' ह्या विषयावर ५६ पानें लिहिल्यानंतरहि जर वाचकांना कांही एक निश्चयात्मक मत ठरवितां आलें नाही तर तो विषय सोडून देणें बरें असें मला वाटतें. मुख्य वादाचा विषय माझ्या पहिल्या लेखांतील ' इ. स. ५–६ व्या शतकांत गोमन्तक असें देशाचें नांव प्रसिद्ध नव्हतें ' असा आहे. रा. शणै गोंयबाब् यांचें म्हणणें इ. स. पूर्वी ३०० वर्षें गोमन्तक असें एका दाक्षिणात्य देशाचें नांव होतें व तो देश म्हणजे हल्लीचा गोवा प्रांत होय. या दोन्ही मतांसंबंधानें आम्ही दोघांनीहि साधकबाधक प्रमाणें वाचकांपुढे मांडलीं आहेत. विद्वान वाचक हेच शेवटीं असल्या वादांत ' सदसद्व्यक्तिहेतवः ' असल्यामुळे हा वाद यापेक्षा जास्त लांबविण्याची माझी इच्छा नाही. या वादांत हरिवंशाचा काळ, त्याचें प्रामाण्य वगैरे दुसरे अनेक फाटे फुटले आहेत. त्यांवर तूर्त विस्तृतपणें लिहिण्याला सवड नाही. रा. शणै गोंयबाब् यांच्या नवीन लेखांतील एक दोन आनुषंगिक मुद्यांविषयी लिहून या वादाची मी रजा घेणार आहें.

गोमन्तक याची गोम + अंतक अशी रा. राजवाडे वगैरे कांही विद्वानांनी व्युत्पत्ति दिली त्याबद्दल मी आपल्या पहिल्याच लेखांत म्हटलें आहे की, ' ती मान्य होण्यासारखी नाही व मला मान्य नाही. इतकें मात्र खरें की, गोम व माच या नांवाचे दोन वीर पुरुष होते व ते दोघेहि लढाईंत कामास आले. ' ह्यांत स्पष्टपणें माझें मत प्रथमच कळविलें कीं, गोम या पुरुषाच्या नांवावरून देशाचें नांव साधणारी व्युत्पत्ति मला मान्य नाही. अशी व्युत्पत्ति देणाऱ्यांचा आधार काय असावा याचा फक्त उल्लेख पुढच्या वाक्यांत गोम व माच यांचीं नांवें देऊन मी केला. परंतु ही व्युत्पत्ति म्हणून मी कधी दिलीच नव्हती व गोम ह्या नांवावरून गोमन्तक साधणें मला मान्य नाही असें स्पष्ट म्हटल्यावर गोम व माच या दोन नांवावरून व्युत्पत्ति साधा असें





मी कसें सुचवीन ? परंतु हल्लींच्या लेखांत रा. शणै गोंयबाब् हे ती व्युत्पत्तीच मी दिली असें बळेंच माझ्या आंगीं चिकटवितात. त्यांत त्यांनी माझ्यावर मनसोक्त ताशेरा झाडला आहे. ' राजवाड्यांच्या व्युत्पत्तीप्रमाणे आपली व्युत्पत्ति नादान व टाकाऊ आहे असें स्पष्ट शब्दांनी त्यांनी सांगितलें असतें तर त्यांच्या सत्यान्वेषणाचा बोज राहिला असता '. रा. शणै गोंयबाब् यांची ह्या लेखांतील एकंदर सर्व भाषा आक्षेपार्ह आहे किंवा नाही तें वाचकांनी पाहावें. मलाहि तशी भाषा लिहितां येईल; परंतु तो प्रस्तुत विषय नसल्यामुळे जास्त लिहीत नाही.

टॉलेमीने ज्या Kouba शहराचा उल्लेख केला तेंच गोवा असें मॅक्क्रिंडल म्हणतो व रा. वर्दे म्हणतात. पण गोवा शहर, गोमन्तपर्वत व गोमन्तकदेश ह्या तीनहि पृथक् गोष्टी आहेत. त्या तिहींचा घोटाळा करून उपयोगी नाही. Kouba म्हणजे गोवा असें गृहीत धरलें तर गोवा शहर प्राचीनकाळीं माहीत होतें असें होईल. शेंकडों प्राचीन शिलालेख व ताम्रपट प्रसिद्ध झाले आहेत त्यांत इ. स. ५००–१००० गोंवा हें शहराचें नांव येतें असें रा. वर्दे यांनी दाखविलें नाही. गोमन्तक देशासंबंधी विवरण झालेंच आहे. गोपकपट्टण असें नांव येतें असें मीच पूर्वी दाखविलें आहे. गोमन्तक असें हल्लींच्या गोवाप्रान्ताचें नांव इ. ५००–६०० च्या सुमाराच्या शिलालेखांत असल्याचें रा. वर्दे यांनी दाखवून द्यावें म्हणजे बरेंच काम होईल.

मार्कंडेयपुराणांत प्राग्ज्योतिष, मद्र, विदेह, ताम्रलिप्तक, मल्ल, मगध, गोमंत हे प्राच्य जनपद आहेत. ह्या श्लोकांसंबंधाने लिहितांना मी मद्र मुद्दाम दडपून ठेविला व माझें सत्यान्वेषण व निःपक्षपातीपणाची पद्धति ह्या कोरड्या बाता ठरतात असें रा. शणै गोंयबाब् ह्यांनी काळ्या टाइपांत ठासून सांगितलें आहे. प्राग्ज्योतिष, विदेह, मगध वगैरे पूर्वेकडील देश आहेत असें हिंदुस्थानच्या साधारणपणें कोणत्याहि भागांत असलेला मनुष्य म्हणेल म्हणून तेवढेच देश प्रामुख्याने घेतले. परंतु सिंधप्रांत किंवा पंजाब येथे लिहिणारा मनुष्य मद्रदेशाला ( जरी तो आम्हा दाक्षिणात्यांना उत्तरेकडे असला ) तरी पूर्वेकडे घालूं शकेल. परंतु हिंदुस्थानच्या कोणत्याहि भागांत लिहिणारा मनुष्य गोव्याला पूर्वेकडे घालूं शकणार नाही. असें त्याने केल्यास ती फारच मोठी चूक केली असें होईल. अशी चूक मार्कण्डेयपुराणकार करील असें मला अजून वाटत नाही.

नंतर पान १८४–१८५ वर रा. शणै गोंयबाब् यांनी मी प्रो. विल्सनसाहेबांचें गोमन्तकाबद्दलचें मत मान्य केलें नाही म्हणून दोन तीन स्तंभ रचून त्यांत माझ्यावर नुसती आग पाखडली आहे. तिला उत्तर देण्याची जरूरी नाही व केवळ रा. शणै गोंयबाब् यांची वादपद्धति कशी असते याचा मासला म्हणून येथे याचा उल्लेख केला आहे.

हरिवंशाचा काळ ठरवितांना रा. शणै गोंयबाब् ह्यांनी पुष्कळ विद्वत्तापूर्ण विवेचन करून माझ्यावर हळूच एक जबाबदारी टाकली आहे. त्यांचें लिखाण वाचल्या-

वरहि हरिवंशांत उल्लेखिलेला अश्वमेध करणारा, सेनानी, औद्भिज्ज, काश्यप असा जो द्विज तोच बाणभट्टानें उल्लेखिलेला पुष्यमित्र होय असेंच माझें मत कायम आहे. रा. शणै गोंयबाब् यांचें मत हरिवंशांतील सेनानी व बाणभट्टानें वर्णिलेला पुष्यमित्र हे भिन्न असले पाहिजेत असें आहे व त्यांनी आपला सिद्धान्त असा ठरविला आहे कीं, हरिवंशकाराचें भविष्य पुष्यमित्राला मुळीच लागू नसून खिस्तपूर्व दुसऱ्या शतकाच्या आधीं होऊन गेलेल्या कोणातरी काश्यपगोत्री ब्राह्मण सेनापतीला लागू असलें पाहिजे. 'ह्या ब्राह्मणाचा शोध प्रो. काणे यांनी जरूर करून त्याचा काळ ठरवावा.' रा. शणै गोंयबाब् यांची युक्ति अजब आहे. हरिवंशीय सेनानी व बाणवर्णित सेनानी एकच असें माझें मत असूनहि माझ्यावरच दुसरा सेनानी शोधून काढण्याची व त्याचकाल ठरविण्याची ते जबाबदारी टाकतात व स्वत: ते भिन्न मानीत असूनहि आपल्यावर कांहीच जबाबदारी घेत नाहीत. हरिवंशांतील 'औद्भिज्ज' हा शब्द बाणभट्टानें वापरला नाहीं म्हणून भिन्नत्व सिद्ध होत नाहीं. दुर्बळ किंवा भोळ्या नृपतींची त्यांच्या शत्रूंनी, सेनापतींनी किंवा अमात्यांनी कशी दुर्दशा केली त्याची एक दोन ओळींत उदाहरणें देऊन बाणभट्टाला मोकळें व्हावयाचें होतें; त्या त्या राजांच्या विस्तृत कथा देणें हें बाणभट्टाचें काम नव्हतें, त्यांचा इतिहास लिहिण्यास तो बसला नव्हता. म्हणून 'औद्भिज्ज' शब्द बाणभट्टकालिदासादि ग्रंथांत आला नाहीं तरी बाध येत नाहीं. पुष्यमित्र शुंगवंशीय होता याबद्दलहि आधारग्रंथांत एकवाक्यता नाहीं. इंडियन हिस्टारिकल क्वार्टर्ली व्हॉ. ५ पान ३९९--४०८ यांत रावबहादुर रामप्रसाद चांदा यांनी पुष्यमित्राबद्दल चांगलें विवेचन केलें आहे. दिव्यावदान ह्या बौद्ध ग्रंथांत पुष्यमित्र हा अशोक मौर्याच्या घराण्यांतील होता असें म्हटलें आहे असें त्यांनी दाखवून दिलें आहे. हरिवंशांत नुसता सेनानी शब्द नसून तो ब्राह्मण सम्राट होता व त्यानें कलियुगांत पुनः अश्वमेध केला हें विशेषतः सांगितलें आहे. समुद्रगुप्ताच्या पूर्वी अश्वमेध करणारा सम्राट पुष्यमित्रच होय. मालविकाग्निमित्रांतहि पांचव्या अंकांत राजसूय ( या ठिकाणीं अश्वमेध ) करणाऱ्या सेनापति पुष्यमित्रानें आपला पुत्र अग्निमित्र ( विदिशा नगरींत राज्य करीत असलेला ) याला लिहिलेलें पत्र दिलें आहे. मालविकाग्निमित्रांत अग्निमित्र आपण 'बैम्बिक' कुलांतील असल्याचें सांगतो ( दाक्षिण्यं नाम बिम्बोष्ठि बैम्बिकानां कुलव्रतम् । अंक ४. १४ ). यावरून पुष्यमित्र हा बैम्बिक कुलांतील होता असें निष्पन्न होतें. रायबहादुर चांदा यांनी औद्भिज्ज शब्दाचा केलेला अर्थ चांगला दिसतो. 'ज्याप्रमाणें आगापिच्छा नसतां, पृथिवींतून वनस्पति उद्भवतात त्याप्रमाणें एकदम पुढें आलेला One who rises suddenly from underground असा 'औद्भिज्ज' याचा अर्थ करावा. म्हणजे upstart, usurper असें त्यांनी सुचविलें आहे व तो अर्थ ग्राह्य आहे. त्याचप्रमाणें 'बैम्बिक' ह्याचा बिम्बी किंवा बिम्बिका इच्यांशीं ( किंवा तोंडल्यांशीं ) संबंध जोडून 'औद्भिज्ज असें विशेषण सेनानी पुष्यमित्राला लावणें शक्य आहे. रायबहादुर चांदा यांचें म्हणणें काश्यप

हा शब्द शुंग याबद्दल चुकून पडला आहे. रा. जायस्वाल यांचें म्हणणें असें की, ज्यांचें गोत्र अवगत नाहीं त्यांना काश्यपगोत्री म्हणत म्हणून पुष्यमित्राला हरिवंशांत काश्यप म्हटलें असावें. तें कांही असलें तरी खिस्तपूर्व कालांतील दोन ब्राह्मण सेनानी अश्वमेध करणारे मानण्याला सबळ पुरावा नाहीं.

गोम या नांवाचें प्राचीनत्व हरिवंशांतील उल्लेखावरून ठरविण्याचा प्रयत्न करितांना रा. शणै गोंयबाब् यांनी हरिवंश हा ग्रंथहि महाभारतकार व्यासानेच लिहिला असें सांगून ' महाभारत व हरिवंश एकाच ग्रंथकाराने लिहिले हें मला मान्य नाही ' या माझ्या वाक्यावर कडक टीका केली आहे. त्यांतील एकच वाक्य उद्धृत करितों. ' त्यांनी त्याचें ( वरील मताचें ) कारण दाखविलें असतें तर बरें झालें असतें. हें मला मान्य नाहीं, हेंच मला मुळीं कबूल नाहीं, हेंच मला पसंत नाही वगैरे वाक्यें त्यांच्या फार आवडीचीं असून त्यांचा ते स्वैर लेखणीने जेव्हा तेव्हा उपयोग करितात. ' गोमंतकावर ५८ पानें लिहिलीं गेलीं तरी रा. शणै गोंयबाब् यांचें समाधान झालें नाहीं मग महाभारत व हरिवंश ह्यांच्या कर्तृत्वाविषयीं शेंकडो पानें खर्चीं घातलीं तरी वाद संपावयाचा नाहीं म्हणून मी ' मला मान्य नाही ' इतकें म्हणून स्वस्थ बसलों. त्याचा गैरवाजवी फायदा ते घेत आहेत. अर्जुनमिश्रासारख्या टीकाकारांना महाभारत, हरिवंश व सर्व अठरा पुराणें यांचा कर्ता व्यासच वाटतो. परंतु निदान पुराणें हीं तरी हरिवंशाच्या मागून अनेक शतकांनीं लिहिलीं गेलीं आहेत असें तर रा. शणै गोंयबाब् ( विविधज्ञानविस्तार वर्ष ६२ पान ६ वर ) म्हणतात. ' विष्णु, भागवत—अग्नि इत्यादि पुराणांत श्रीकृष्णाचें चरित्र थोडेंबहुत आलें आहे परंतु हीं सर्व पुराणें हरिवंशानंतर बऱ्याच शतकांनी रचलेलीं असून हरिवंशांतील मूळ कथेंत कमजास्त फेरफार करून लिहिलीं आहेत ह्यांत **संशय नाही.** ' मग रा. शणै गोंयबाब् यांनी अनुसरलेल्या विचारसरणीप्रमाणे मी हरिवंश महाभारतकारानेंच लिहिलेलें नव्हे असें म्हटलें तर मी भयंकर व अक्षम्य अपराध केला असें रा. शणै गोंयबाब् कां भासवितात ? अर्जुनमिश्रानें ' शान्तिरनुशासनम् ' हें एकच पर्व मानावें अशी क्लृप्ति हरिवंशाच्या अठरा पर्वांत अंतर्भाव करण्याकरिता काढिली; पण ती महाभारतांतीलच श्लोकांशीं विरोधी असल्यामुळे अगदीं टाकाऊ आहे. बुडत्याला काडीचा आधार असें म्हणतात त्याचप्रमाणे असल्या कुचकामाच्या क्लृप्तीचा आधार आपणाला अत्यंत चिकित्सकबुद्धीचे व ' नामूलं लिख्यते ' असे बद्धपरिकर समजणारे रा. शणै गोंयबाब् घेतात याचेंच आश्चर्य वाटतें. पर्वसंग्रहपर्व ( आदिपर्व अध्याय २ भाण्डारकर इन्स्टिट्यूट प्रत ) श्लोक ७२ पासून अठरा पर्वें त्यांचीं नांवें व विषय सांगितले आहेत. त्यांत शान्तिपर्व हें बारावें पर्व असें स्पष्ट सांगून त्यानंतर अनुशासनपर्व जाणावें व नंतर चवदावें अश्वमेधिकपर्व आहे असें सांगितलें आहे. तेव्हा शान्तिपर्व व अनुशासनपर्व हीं दोन भिन्न पर्वें आहेत हें महाभारतकारांचें म्हणणें असल्यामुळे अर्जुनमिश्राची व त्याला अनुसरणाऱ्या रा. शणै गोंयबाब्ची ' लटपट ' मुळीच चालणार नाहीं. यांत माझी कांहीच ' लटपट ' नाही

( वि. वि. ६४ पान १९२ ). एवढयानेच भागत नाही. शेवटीं स्वर्गपर्वाला अठरावें म्हणून अठरा पर्वें याप्रमाणे आहेत असें सांगून मग खिलांत हरिवंश येतें असें सांगितलें आहे. येथे हरिवंशाला एकोणिसावेंहि म्हटलें नाही किंवा अठरांत त्याचा अंतर्भाव केला नाही. शंभर पर्वें जेथे सांगितलीं त्यांतसुद्धा हरिवंशाला खिल म्हटलें आहे. शंभर पर्वांची मोजदाद निराळ्या पद्धतीने करावयाची आहे व अठराच पर्वें महाभारताचीं आहेत असें जेथे ( श्लोक ७१ ) सांगितलें तेथे मोजदाद निराळ्या पद्धतीने करावयाची आहे. हरिवंशासह शंभर पर्वें होतील. परंतु महाभारताचीं म्हणून जीं अठरा पर्वें त्यांत महाभारताच्या पर्वसंग्रहपर्वाचा जो कर्ता त्यानें हरिवंशाचा अन्तर्भाव केला नाही हें स्पष्ट आहे.

अतःपरं शान्तिपर्व द्वादशं बुद्धिवर्धनम् । १९६; अत ऊर्ध्वं तु विज्ञेयमानुशासनमुत्तमम् । २०१; ततोश्वमेधिकं नाम पर्व प्रोक्तं चतुर्दशम् । २०६; स्वर्गपर्व ततो ज्ञेयं दिव्यं यत्तदमानुषम् । २३२; अष्टादशैवमेतानि पर्वाण्युक्तान्यशेषतः । खिलेषु हरिवंशश्च भविष्यच्च प्रकीर्तितम् । २३३.

गोमन्तक पर्वतावरून करवीरपुरास पोचण्यास श्रीकृष्णाला चार दिवस लागले. श्रीकृष्णाच्या रथाचे घोडे वायुवेगाने पळणारे खास पार्गेतील होते. करवीरपूर (कोल्हापूर ) येथून कुवेशी घाट ११५ मैल आहे असें रा. शणै गोंयबाब् म्हणतात व गेरसप्पाजवळचा प्रदेश १८० मैल आहे असें तेच म्हणतात. तेव्हा हरिवंशकाराला कोणतें स्थान गोमन्तक म्हणून अभिप्रेत होतें हें ठरविण्याला एक उत्तम साधन वरील अंतरांत आहे. रा. शणै गोंयबाबच्या मताने एका दिवसांत श्रीकृष्णाचे वायुगति अश्वहि २९।३० मैल पळत होते यांत शंका नाही. माझें म्हणणें रथाला अनेक घोडे जुंपून तो जाण्याइतका साधारण वस्तीचा आणि दाट अरण्य नाही असा प्रदेश (मग तो खडकाळ का असेना) असला तर दर दिवशीं २९।३० मैलच चाल झाली असें मानणें अत्यंत हास्यास्पद आहे. त्यापेक्षा रोजीं ४५।५० मैल झाली असें मानणें जास्त संयुक्तिक आहे. ह्या माझ्या म्हणण्याची वासलात रा. शणै गोंयबाब् यांनी 'ह्याप्रमाणे सारासार विचारास सोडचिठ्ठी दिल्यावर सत्यान्वेषणाची किंमत ती काय राहिली !' ( पान १९४ ) ह्या तिखट वाक्यांत लाविली आहे. सारासार विचाराला सोडचिठ्ठी कोणी दिली इतकाच प्रश्न आहे. तो सोडविण्याचें काम रा. शणै गोंयबाब् यांनी आपल्या अंगावर न घेतां वाचकांवर सोंपविलें असतें तर बरें झालें असतें. आपणच वादी व आपणच न्यायाधीश अशी भूमिका रा. शणै गोंयबाब् घेत आहेत. ह्या वरील वाक्याशिवाय दुसरी नवीन उपपत्ति किंवा युक्ति रा. शणै गोंयबाब् यांच्या मेंदूंत उतरली नाही यावरूनच पाणी कोठे मुरत असावें हें वाचक ताडतीलच. एखाद्या सिद्धान्ताच्या उपपत्तीविरुद्ध बोलतां येत नसलें म्हणजे तो सिद्धान्त मांडणाऱ्याला शिव्या देण्याची कांही लेखकांची रीत असते. ज्यांना दिवसांत श्रीकृष्णाचे 'वातरंहसः' असे घोडे २९।३० मैलच कोल्हापूर ते कुवेशी पळाले असें मानावयाचें असेल त्यांनी खुशाल तसें मानावें. त्यांचा हात कोण धरणार ? परन्तु विवक्षित परिस्थितींत रथाचे घोडे एका दिवसांत

किती पळाले असतील या बाबतींत मतभेद प्रदर्शित करणाऱ्याने सारासार विचाराला सोडचिठ्ठी दिली असें वाक्य ज्याची लेखणी प्रसवितें त्याच्या सारासार विचाराची, सभ्यतेची, शालीनतेची व सरळपणाची सर्व लोक तारीफच करतील.

रा. शणै गोंयबाब् यांनी आपल्या पूर्वीच्या लेखांत आपलें म्हणणें 'सरळपणानें' मान्य करण्याचा मला उपदेश केला आहे (वि. वि. ६२ पान १९). ह्या लेखाच्या शेवटींहि त्यांनी दोनदा सरळपणानें लिहिण्याचा उपदेश केला आहे आणि सरळ-पणाच्या तोंडाला काळें केलें आहे. ' त्यांनी सत्यान्वेषणाच्या तत्त्वास अनुसरून सरळ-पणें आपले मुद्दे मांडले असते तर मला एवढें विस्तृत लिहिण्याची गरजच राहिली नसती. ' रा. शणै गोंयबाब् यांचें बरेंच लिखाण मराठी वाचकांपुढे आहे; मीहि मराठींत त्यांच्याइतकें लिखाण केलें नसलें तरी थोडें फार लिहिलें आहे. कोणाची लेखनपद्धति सरळपणाची असते, कोणाची वावदूकी असते याचा निर्णय वाचक आपआपल्या मनाशीं करतीलच; रा. शणै गोंयबाब् यांनी परोपदेशे पाण्डित्य करण्याची आवश्यकता नाही. एखाद्या बालिशापासूनहि चांगल्या गोष्टीचें ग्रहण करावें असें ' बालादपि सुभाषितं ग्राह्यं ' यांत सांगितलें आहे. परंतु उपदेश कोणाच्या तोंडून येतो यावर उपदेशाची किंमत लोक काय करितील हें अवलंबून असतें असें ' गता-नुगतिको लोकः ' ह्या श्लोकांत जें तत्त्व गोंवलें आहे तें बहुश्रुत रा. शणै गोंयबाब् यांना मी सांगितलें पाहिजे असें नाही. सरळपणा शिकण्यासाठी रा. शणै गोंयबाब् यांना गुरु करण्याची मला अवश्यकता दिसत नाही. प्रस्तुतच्या त्यांच्या लेखांतील ( वि. वि. वर्ष ६४ ) त्यांच्या सरळपणाचे दोनच मासले देऊन हा लेख पुरा करितों.

१. पान १८४ वर ते लिहितात " मराठी साहित्यसंमेलनाचे ते ( काणे ) वारकरी आपले संशोधनात्मक निबन्ध मराठींत लिहिण्याऐवजीं मुद्दाम इंग्रजींत लिहि-तात. याचें मुख्य कारण ते तुच्छ व अज्ञ ' साहेबांच्या ' वाचनांत येऊं नयेत असेंच आहे काय ?" मी आपले संशोधनात्मक निबंध मुद्दाम इंग्रजींत लिहितों हें रा. शणै गोंयबाब् यांना कोणी सांगितलें. मी ज्या विषयांवर इंग्रजींत निबंध लिहिले त्यांतील बहुतेकांवर ( अलंकारशास्त्र, धर्मशास्त्र, प्राचीन इतिहास व भूगोल वगैरे ). मराठींतहि लिहिले आहेत हें निदान विविधज्ञानविस्ताराच्या वाचकांना व परिचितांना सांगण्याचें कारण पडूं नये. साहेबांना तुच्छ व अज्ञ असें मी केव्हा म्हटलें ? कोणाच्याहि मता-विरुद्ध स्पष्ट लिहिलें की त्यांना लेखक तुच्छ व अज्ञ समजतो असें रा. शणै गोंयबाब् यांना सरळपणाने वाटतें. आणि माझ्या साहित्यसंमेलनाच्या वारींचा उल्लेख त्यांनी फारच सरळपणाने केला आहे. त्यांत सरळपणा आहे की उपहास भरला आहे हें तेच एक जाणोत किंवा कदाचित् परमेश्वर जाणे. मराठी–साहित्यसंमेलनाला वारंवार जाणें हा दोष की गुण तें रा. शणै गोंयबाब् सरळपणाने सांगतील काय ? माझ्या संमेलनाच्या वारकरीपणाचा प्रस्तुत वादाशीं संबंध काय ? भारतवर्षीय आधुनिक विद्वानांपैकी बरेच लोक इंग्रजी भाषा वापरतात. मराठी भाषा त्यांच्यापैकीं दशां-

शालाहि समजत नाही म्हणून दुर्दैवाने इंग्रजींत लिखाण करावें लागतें. हेंहि रा. गोंयबाब् यांच्या सरळ मनांत शिरलें नाही.

२. 'ऊर्मिमन्तं समुद्रं च अपारद्वीपभूषणम्' ह्या हरिवंशांतील श्लोकार्धांतील 'अपारद्वीप' याचा अफाट किंवा विस्तृत भूभाग असा अर्थ करावा असें माझें म्हणणें व रा. शणै गोंयबाब् यांचा अर्थ 'अनन्त अशीं बेटें' असा आहे. मी त्या श्लोकार्धाचें भाषांतर 'लाटांनी युक्त व विस्तृत (किंवा अफाट) द्वीपाला एखाद्या भूषणाप्रमाणे शोभणारा समुद्र' असें दिलें आहे (साहित्यपत्रिका वर्ष ३ पान १४३). याविषयी रा. शणै उद्गारतात 'संस्कृत चरणांत ऊर्मिमन्तं हें धडधडीत समुद्राचें विशेषण असून मराठी भाषांतरांत प्रो. काणे ह्यांनी ते द्वीपाचें विशेषण केलें आहे. केवढी ढोबळ चूक ही! असें असतां साहेबाच्या संस्कृत ज्ञानाला नाक मुरडून त्याला कमी लेखण्याचा हक्क त्यांना कितपत पोचतो तें समजत नाही.' साहेबाइतकें किंवा रा. शणै गोंयबाब् इतकें मला संस्कृत येत नाही. परंतु शाळेंतील मातृक्रेशन परीक्षेला न बसणाऱ्या विद्यार्थ्यालाहि जें सहज समजेल किंवा त्याला संस्कृत व्याकरणाचें जितकें ज्ञान असेल तितकेंहि मला नाही असें रा. शणै गोंयबाबचें ठाम मत दिसत आहे. 'ऊर्मिमन्तं' हें समुद्राचें विशेषण असून 'अपारद्वीपभूषणं' ह्या समासांत गडप झालेल्या द्वीप शब्दाचें तें विशेषण मानणें शक्य नाही. इतकेंहि संस्कृताचें ज्ञान लोक ज्यांना निष्कारण प्रोफेसर म्हणतात त्यांना नसतें असा शणैचा सरळपणें आशय दिसतो. रा. शणै गोंयबाब् यांच्या लेखांत जागोजाग 'मी असें सिद्ध केलें आहे' हें वाक्य येतें. बहुतेक ठिकाणीं त्यांनी जें सिद्ध केलेलें असतें तें त्यांच्या मनाला पटण्यासारखें असतें, परंतु इतरांना पटण्यासारखें नसतें. त्यांच्या लिखाणांत 'माझें असें म्हणणें आहे' वगैरे सारखे प्रयोग क्वचितच येतात. त्यांच्या मताशीं कोणी विरोध प्रदर्शित केला तर त्यांच्या पायाची आग मस्तकास पोचते व मग ते त्या माणसावर असद्धेतूंचा आरोप ताबडतोब करितात हें वर जे निवडक उतारे त्यांच्या एकाच लेखांतील दिले आहेत त्यांवरून स्पष्ट होईल. दुसरा एखादा जास्त सावधगिरीने लिहिणारा किंवा विनयशील लेखक असता तर त्याला शंका आली असती कीं आपण ढोबळ चूक म्हणतों ती दुसऱ्याची ढोबळ चूक नसून आपलीच कांही तरी चूक असण्याचा संभव आहे. परंतु शणैचें बेगुमान मन असल्या लेचापेचा विचारांना थारा देत नाही. त्यांना सरळपणाचा खिळा बोचला असल्यामुळें जिकडे तिकडे (लोकांच्या) ढोबळ चुका दिसूं लागतात. वरील भाषांतरांत 'लाटांनी युक्त' हें ऊर्मिमन्तंचें भाषांतर आहे आणि 'विस्तृत द्वीपाला एखाद्या भूषणाप्रमाणे शोभणारा' हें 'अपारद्वीपभूषणं'चें भाषांतर आहे व हे दोन्ही तुकडे 'समुद्रं'चे विशेषण आहेत हें 'असा समुद्र' या भाषांतराने दाखविलें आहे. 'अपारद्वीपभूषण' हा बहुव्रीहि न घेतां तत्पुरुष घ्यावा असेंच मी आपल्या मागील लेखांत (सा. पत्रिका वर्ष ३ पान १४३) म्हटलें होतें व तें स्पष्ट करण्याकरिता मुद्दाम 'विस्तृत द्वीपाला एखाद्या भूषणाप्रमाणे शोभणारा' असें

लांबच लांब भाषांतर दिलें. त्याचप्रमाणे पुनः साहित्यपत्रिका वर्ष ४ पान १०४ येथे 'कल्लोलयुक्त व अपारद्वीपभूषणं असा सागर पाहूं' असें भाषांतर केलें ह्यांत कोठेंहि चूक नाही. परंतु काणे हे आपलें मत एकदम चुकलेलेच असले पाहिजेत असें सरळपणाने वाटणाऱ्या मनुष्याला त्यांचा अर्थ चुकीचा आहे असें वाटणें व भाषांतरित शब्दांचा संबंध अवास्तव रीतीने लावून चूक दाखवितां येते यांत सरळपणा व पराजय केल्याचा आणि उपहासाचा आनंद असल्यामुळें तोच त्याने दाखविणें हें अगदी सरळच प्राप्त होतें.

रा. शणै गोंयबाब् यांच्या सरळपणाचीं आणखीहि उदाहरणें या एकाच लेखांतून देतां येतील; परंतु तीं देण्याची तादृश अवश्यकता नाही. कोळसा उगाळावा तितका काळाच !

---

# व्युत्पत्ति व शब्दशुद्धि यांसंबंधीं कांहीं तत्त्वें

(ले.—विष्णु हरि निजसुरे)

१ व्युत्पत्ति संस्कृतच असली पाहिजे काय ? व्युत्पत्तीच्या तऱ्हा दोन. त्याच भाषेंतील शब्दावरून शब्दरूपाची साधनिका हा एक प्रकार. उ०—तोड धातूपासून तोडणारा हा शब्द. आणि अन्य भाषांपासून अपभ्रंश हा दुसरा प्रकार. उ० कर्मपासून काम. आता कित्येकदा एकच मराठी शब्द संस्कृतापासून साधितां येईल किंवा मराठींतच तो उत्पन्न झाला असें म्हणतां येईल. अशा वेळीं निवळ मराठींतूनच तो शब्द साधणें हें 'लाघवगौरवन्यायाने' योग्य होईल. एखादी उपपत्ति कमी पायऱ्यांत सांगणें ह्याला संस्कृत शास्त्रकार लाघव म्हणतात व अधिक पायऱ्यांत ती सांगणें ह्याला गौरव म्हणतात. लाघव हेंच केव्हाहि इष्ट होय. मात्र लाघवाने फलप्राप्ति न होतां जर ती गौरवाने साधितां येत असेल तर मात्र गौरव हा दोष दोष होत नाही. (फलमुखगौरवं न दोषाय). हें उदाहरणांनी स्पष्ट करूं. 'त्याला काय दगड येतें, तो करील हो हें ! दगड, तो काय करणार,' अशा ठिकाणचा दगड हा शब्द राजवाड्यांनी संस्कृतांतील 'दग्घ' शब्दापासून व्युत्पादिला आहे. संस्कृतांत 'दग्घ' शब्द हा अपशब्दासारखा-मराठींतील बायकांच्या तोंडांतील 'जळ्ळा मेला' शब्दासारखा—वापरतात. म्हणून दग्घचा अपभ्रंश दगड असा तुच्छता किंवा तिटकारा दर्शविणारा झाला असें राजवाड्यांचें प्रतिपादन. पण यावर असें म्हणतां येईल की, संस्कृत दृषत् = पाषाण ह्यापासून दगड हा पाषाण या अर्थाचा शब्द बनला व नंतर मराठी बोलणारेच तो अपशब्दासारखा वापरूं लागले. राजवाड्यांच्या मतें अर्थहि संस्कृतोत्पन्न व शब्दहि संस्कृतोत्पन्न. पण दुसऱ्याच्या मतें शब्दस्वरूप संस्कृतोत्पन्न व अर्थ मात्र मराठींतूनच. दोन्ही गोष्टी संस्कृतांतून घेतल्या असें मानण्यापेक्षा एकच संस्कृतांतून घेतली असें मानण्यांत लाघव आहे. 'तो काय करील भुरी,' 'माती, त्याला काय

समजतें, ' वगैरेंतील भुरी, माती यांचा अर्थ जसा निवळ मराठी आहे तसाच तो दगड याचा आहे. दृषद् व मृत्तिका हे शब्द अशा अर्थाच्या वाक्प्रचारांत संस्कृतांत नाहीत. मृत्पिंडबुद्धि असा मात्र एक निराळा वाक्प्रचार आहे. आता हाच न्याय ' हातचा मळ ' ह्या वाक्प्रचारास लावूं. शरीराच्या मळांवरून बनविलेले अनेक वाक्प्रचार वर्ण्यविषयाविषयी तिटकारा, तुच्छपणा, किळस वगैरे अर्थ दाखविण्याकरिता मराठींत रूढ आहेत. उ० केस काढून मढें हलकें करणें, नाकांतला बाल (केस), आपण हंसे लोकाला, शेंबूड माझ्या नाकाला, नखाचीहि सर न येणें, थुंकी झेलणें, हग्या मार, कार्यांत घाण केली या अर्थी ' हगले, ' घामस्या काढणें, मुंगीला मुताचा पूर, पादऱ्याला पावस्याचें निमित्त, झव्यें कुत्रें वगैरे वगैरे. तेव्हा या वाक्प्रचारांच्या पद्धतीनेच ' हातचा मळ ' हा निवळ मराठी वाक्प्रचार मानणें यांतच लाघव आहे. 'हस्तामलक' या संस्कृत शब्दावरून तो साधणें यांत गौरव आहे. म्हणून संस्कृतांतील व्युत्पत्ति मानण्यापेक्षा मराठींतूनच ती मानणें अधिक सयुक्तिक आहे. शिवाय अंगचा मळ हाहि वाक्प्रचार आहे व ज्ञानेश्वरांनी तळहातीचें रत्न जैसें । (अ० ७–२) असा दृष्टान्त घेतला आहे व संस्कृतांतहि हस्तामलक, करतलामलक प्रमाणेच करतलगतबदरसदृशं असाहि प्रचार आहे. तेव्हा मराठी बोलणारांनीहि स्वतन्त्र वाक्प्रचार बनविल्याचें श्रेय कां घेऊं नये ?

२ **अपभ्रंश अर्थान्तरावर दृष्टि ठेवून होतात काय ?** सीमंतपूजन याचा श्रीमंतपूजन असा अपभ्रंश स्त्रिया व मुलें करतात तो शुद्ध मानावा, कां तर सीमंत शब्दापेक्षा श्रीमंत शब्द हा त्या समारंभाचा थाट सुचविण्यास जास्त योग्य आहे असें वाटतें. पण तें बरोबर नाही. कारण अपभ्रंश करणारे उच्चारदौर्बल्यामुळे व न कळत अपभ्रंश करतात. जाणून बुजून अपभ्रंश कोणी करीत नाहीत इतकेंच नव्हे तर शब्दाचें मूळ शुद्ध स्वरूप अज्ञांस समजावून दिलें म्हणजे ते शुद्ध रूपच वापरतात. सुशिक्षित स्त्रिया कधीहि ' श्रीमंतपूजन ' म्हणणार नाहीत. अपभ्रंश हा ठाऊक असलेल्या शब्दस्वरूपाशीं जुळणारा असा अनेकदां होतो, पण तेथे अर्थविचार मुळीच नसतो. उ० कंपनी (सरकार) याचा अपभ्रंश जेव्हा कुंपणी असा झाला तेव्हा कुंपण या ओळखीच्या शब्दस्वरूपामुळे झाला. कुंपण शेताला वेढतें त्याप्रमाणे कंपनीने देशाला पारतन्त्र्याचा वेढा दिला हा अर्थ कांही बोलणारांच्या मनांत नव्हता. रिक्रूटचा ' रंगरूट ' बनवितांना कांही खाकी रंग डोळ्यापुढे नव्हता. आता कित्येकदा अर्थदृष्ट्या विनोदाने व उपहासाने विदग्ध लोक जाणून बुजून अपभ्रंश करतात पण ते खरे अपभ्रंश नव्हेत व ते रूढ होणार नाहीत व येतील तेव्हा अवतरणांत येतील. उ०—नॅशनॅलिस्ट याचा अपभ्रंश ' नाशनिष्ठ, ' म्युसोलिनी याचा ' मुसळमुनी ' वगैरे. तात्पर्य, अपभ्रंश करतांना मुखाच्या स्नायूंचाच उपयोग असतो. तेथे अर्थ बदलण्याच्या धोरणाने उच्चारविकृति होत नाही. होते असें मानल्यास विकृत उच्चार करणारास मूळ अर्थाप्रमाणे शुद्धस्वरूप माहीत होतें असें मानावें लागतें व मग शुद्धस्वरूप माहीत असूनहि लोक अशुद्ध बोलतात असें मानण्याची अनिष्टापत्ति येते. पण शुद्धस्वरूप माहीत असणारा कोणीहि अशुद्ध रूप उच्चारणार नाही. उच्चारविकृतींचें कारण फक्त मुखदौर्बल्य होय आणि अर्थान्तराचें कारण मात्र मानसिक व्यापार असाच सिद्धान्त भाषाशास्त्रज्ञांनी बांधलेला आहे.

३ कोणते अपभ्रष्ट शब्द शुद्ध व कोणते अशुद्ध ? अपभ्रंश हे मुखदौर्बल्यामुळेच होत असल्यामुळे त्यांत विचाराचा मानसिक व्यापार नसतो. म्हणून कल्पनाप्राशस्त्य, नुसता अवयवसंवाद नव्हे तर अवयवार्थनिकर्ष व कल्पनासंवाद वगैरे मानसिक व्यापारांचे परिणाम ज्या अपभ्रष्ट शब्दस्वरूपांत असतील तेवढेच शुद्ध व बाकीचे अपभ्रष्ट शब्द अशुद्ध ठरवावे असें म्हणतां येणार नाही. शुद्धाशुद्धतेला एकच नियम व तो म्हणजे 'शिष्टमान्यता' उ०— स्पष्ट शब्दाचा समर्थांनी 'पष्ट' असा अपभ्रंश केला आहे. कोणी 'स्वष्ट' असा व कोणी 'सपष्ट' असा अपभ्रंश करतात पण शिष्ट हे ह्यांपैकी कोणताच मान्य करीत नाहीत. ते 'स्पष्ट' हाच शब्द वापरतात. कर्म याचें 'काम' हें रूप शुद्ध मानतात. 'करम्' हें शुद्ध मानीत नाहीत. पण कर्मचें काम म्हणून धर्मचें 'धाम' करीत नाहीत. कर्मचें करम् हें अशुद्ध म्हणून धर्मचें 'धरम्धक्का' यांतील धरम् हें अशुद्ध नाही. तेव्हा शिष्टमान्य तें शुद्ध.

४ अपभ्रंशाच्या नियमांप्रमाणे अपभ्रष्ट रूप नसेल तर तें अशुद्ध समजावें असा नियम करितां येत नाही. वर कर्म, करम्, काम, धर्म, 'धाम' व धरम् याच्या शुद्धतेविषयी जें विवेचन केलें त्यावरूनच हा नियम करणें गैर ठरतें. इष्टका याचा वीट असा अपभ्रंश होतो म्हणून ईश्वर याचा अशिक्षितांच्या तोंडचा 'वीश्वर' हा अपभ्रंश शुद्ध म्हणतां येणार नाही. म्हणूनच चक्र याच्या चाक या अपभ्रंशांत अन्त्य व्यंजनाचा लोप होतो. त्याच्या उलट चरित याच्या चरित्र या अपभ्रंशांत एक वर्ण अधिक आला म्हणून चरित्र हा अपभ्रंश अशुद्ध ठरत नाही. (आमच्या मतें चरित्र हा तत्सम शब्दच संस्कृतांतून आलेला आहे. तो अपभ्रंश नव्हे). तात्पर्य, नियमाप्रमाणे अपभ्रंश होणें न होणें हें शब्दशुद्धीचें प्रयोजक नव्हे. अपवादन्यायाने सामान्य नियमाविरुद्ध एखाद्या अपभ्रष्ट शब्दाची व्युत्पत्ति असूं शकेल व तोच त्या शब्दापुरता नियम होईल.

५ व्युत्पत्तीच्या चर्चेला कोणते शब्द घ्यावयाचे ? जे शब्द शिष्ट बोलींत व विशेषतः ग्रांथिक भाषेंत रूढ झालेले आहेत तेच मुख्यतः व्युत्पत्तीचे विषय होऊं शकतात. ज्यांचा उपयोग शिष्ट करीत नाहीत असे शब्द व्युत्पादण्याचें कारण नाही. शुद्ध शब्दांच्या व्युत्पत्तीवर प्रकाश पाडण्याकरिता अशुद्ध शब्दांच्या विचाराची मदत होऊं शकेल. या नियमाप्रमाणे श्रीमंतपूजन, लज्जाहोम, संकष्ट, दुष्ट अशा शिष्टभाषेंत रूढ नसलेल्या शब्दांची व्युत्पत्ति मुख्यत्वें चर्चिण्याचें कारण नाही. ते रूढ झाल तर त्यांस शास्त्रीय पदवी येईल. तोंपर्यंत नाही.

६ वाक्प्रचार घडविण्याची क्रिया शिष्ट, अशिष्ट, स्त्री, पुरुष या सर्वांकडूनच होते. हातचा मळ हा निवळ मराठी वाक्प्रचार मानल्यास तो बनविणारे घाणींत काम करणारे होते म्हणजे मजूर होते असें जरी ठरलें तरी भाषा ही पंडितांची आहे तशी अविद्वानांची नाही की काय ? त्यांचीहि आहे. अडाणी समजल्या जाणाऱ्या स्त्रियासुद्धा किती सुंदर म्हणी बनवितात ! शिवाय भाषाही पण्डितच बनवितात असें वादासाठी मान्य केलें तरी ज्या धंद्यावरून वाक्प्रचार बनवावयाचे तो स्वतःच केलेला असला पाहिजे असें नाही. त्यांतील क्रिया बघितल्या ऐकिल्या तरी काम भागेल. न्याय— वेदान्तादि शास्त्रांत घट, पट वगैरेंचे दृष्टान्त देणारे शास्त्रकार स्वतः कुंभार, कोष्टी किंवा सोनार होते असें यांतला भाग नाही.

**७ व्युत्पत्तिचर्चेत शास्त्रीय परिभाषेचा योग्य तो उपयोग करणें इष्ट आहे.** व्युत्पत्तीमध्ये शब्दांचे अर्थ कसे बदलतात हें पुष्कळदा पाहावें लागतें. अर्थान्तर होण्याच्या व्यापाराला लक्षणा म्हणतात. कित्येक विद्वांनाचा लक्षणेविषयी गैरसमज दिसतो. पण भाषेंत लक्षणेनेच फार बदल होत जातो. उ०—गोड म्हणजे गुळाने ज्याला माधुर्य आलें आहे असा. हा ‘प्राथमिक’ अर्थ. पण संस्कृतांत प्राथामिक अर्थालाच मुख्यार्थ व वाच्यार्थ अशा संज्ञा आहेत. तेव्हा ही नवी संज्ञा अवश्य नाही. आता गोड याचा विशिष्ट अर्थ रूढ आहे तसाच त्याचा सामान्यतः मधुर असाहि अर्थ झाला. येथे विशेषसामान्यसंबंधाने लक्षणा झाली व ह्या येथल्या सामान्य अर्थाला लक्ष्यार्थ म्हणावयाचें. लक्ष्यार्थ हा पारिभाषिक शब्द असतांना ‘प्राचारिक’ हा नवा शब्द बनविण्याची जरूर नाही. प्राचारिक अर्थ म्हणजेच निरूढलक्षणेने झालेले अर्थ. तसेंच कृत्रिम वस्तूंस निसर्गांतील वस्तूंच्या सादृश्याने नांवें देतात. अशा ठिकाणीं गौणी लक्षणा होते. करंजाच्या फळासारखी म्हणून ‘करंजी’ हा शब्दप्रयोग गौणीलक्षणेचें उदाहरण आहे. ह्या गौणी लक्षणेचा विषय फार विस्तृत आहे म्हणून सादृश्यगर्भलक्षणा हा स्वतंत्र प्रकार व इतर सर्व संबंधाने होणाऱ्या लक्षणा शुद्ध ह्या एका प्रकारांत येतात. असो लक्षणेचें विवेचन आम्ही एका स्वतन्त्र निबंधांत करावयाचें योजिलें आहे. तेव्हा त्याविषयी येथे जास्त लिहीत नाही.

**८ प्रत्यक्षाशीं विरुद्ध अशीं अनुमानें व्युत्पत्तीने काढूं नये.** मधु यापासून मधुर व गुड पासून गोड असे माधुर्यदर्शक शब्द झाले तसा साखर यापासून माधुर्यदर्शक विशेषण शब्द झाला नाही. तेव्हा साखर ही आपल्या जीविताशीं एकरूप झाली नाही हें अनुमान प्रत्यक्ष अनुभवाला विरुद्ध आहे. हल्ली गुळापेक्षा साखरेचाच बोलबाला अधिक आहे. पूर्वीचा गुळखोबऱ्याचा खाऊ जाऊन साखरेच्या पदार्थांनीच त्याची जागा घेतली आहे. चहाने साखरेकडून दिग्विजयच करविला आहे. गुळाच्या शिऱ्याऐवजी—की जो खरोखरच जास्त स्वादिष्ट असतो—साखरेचा शिरा आला, साखरेचीं पक्वान्नें, साखरेची मिठाई, साखर वाटणें, पेढे वाटणें अशा तऱ्हेने साखरेचाच प्रचार फार. गूळ बिचारा फक्त भाजींत थोडासा टाकला म्हणजे झालें. तेव्हा ज्येष्ठ प्रमाण जें प्रत्यक्ष त्याने येथील अनुमान लटकें पडलें. तर मग साखरेपासून विशेषण कां झालें नाही ? याचें उत्तर असें. एक तर गोड हा शब्द सामान्यार्थाने माधुर्यार्थी रूढ झालाच आहे. शिवाय तो दोनअक्षरी आहे, म्हणून मधुरपेक्षा आखूड आहे. तो निवळ मराठी आहे. साखरेपासून विशेषण बनवावयाचें तर तें लांबट व कर्णकर्कश होणार. संस्कृतपद्धतीवर साखरपासून विशेषणें म्हटलीं तर साखर, साखरेय, साखरीण, साखरिक अशीं होतील तर मराठी पद्धतीप्रमाणे साखरवाला, साखरेल, साखऱ्या अशा प्रकारचीं होतील. पण यांपैकी कोणत्याच शब्दाला ‘गोड’ शब्दाची सर येणार नाही. तेव्हा गुळाइतका साखरेचा प्रचार नाही म्हणून साखर शब्दापासून विशेषण बनले नाही असें नव्हे तर गोड शब्दाने आता सर्वप्रकारें काम भागतें म्हणून.

**९ शास्त्राचें निर्विकल्पत्व व तर्ककर्कशत्व.** शास्त्र हें निर्विकल्पक असूंच शकत नाही. शास्त्र झालें तरी मनुष्याच्या व्यवहारावरच अवलंबून असतें. तो व्यवहार अपुरा तर शास्त्रहि

अपुरेंच. तर्कानें शास्त्राची पूर्ण कड लागूंच शकत नाही. एवढें मोठें वेदान्तशास्त्र; पण तर्क-दृष्ट्या बादरायणाचार्योंना 'उपपद्यते चाप्युपलभ्यते च', 'सर्वधर्मोपपत्तेश्च' अशी वेळ मारूनच न्यावी लागली आहे. तर्ककर्कशतेची पेंट मारणारें शास्त्र अव्यवस्थेलाच चुंबत व्यवस्था असें म्हणतें. याला उदाहरण. अपवाद, प्रत्यपवाद ही व्यवस्था. व्याकरण व व्युत्पत्तिशास्त्र यांत तर परस्परविरुद्ध नियमांचा बुजबुजाट आहे. 'विप्रतिषेधे परं कार्यं,' या पाणिनिसूत्राचे प्रत्यक्ष भाष्यकारांनाच दोन परस्परविरुद्ध अर्थ करावे लागले आहेत. पृषोदरादित्वात् साधुः, आकृतिगण, उणादींच्या व्युत्पत्तींतील बाहुलकाचा म्ह० वाटेल तशी व्युत्पत्ति जुळविण्याचा नियम हीं अव्यवस्थेलाच व्यवस्था ठरविणारीं उदाहरणें नव्हेत काय? भाषा तर बोलून चालून भोंगळच. पण गणितासारखें निश्चित व केवळ मूर्तिमंत तर्क असें दुसरें शास्त्र नाही. पण तें-सुद्धा ऋणसंख्येचें वर्गमूळ काढतां येतें अशी चुकीची कल्पना गृहीत धरून आपल्या एका प्रकरणाचा विस्तार करतें. आधिभौतिक शास्त्रांत तरी कार्यकारणसंबंध निपरवाद असावयाचे. पण सर्व पदार्थ थंड होत असतांना आकुंचन पावतात, तर बर्फ मात्र प्रसरण पावतें. शास्त्र आपली पगडी चटकन कशी फिरवितें याचें रसायनशास्त्रांतील एक उदाहरण पाहा. दाबाने पदार्थांचें महत्त्व कमी होतें हा नियम. आता दाब अनंत केला तर महत्त्व शून्य व्हावें असें तर्क चटकन म्हणेल; पण पदार्थविनाश शक्य नसल्यामुळे शास्त्र टोलवाटोलवी करून उत्तरतें की त्यावेळीं कांही आपणास सध्या अगम्य असें अवस्थांतर होईल. एक जरी विरुद्ध उदाहरण भेटलें तरी शास्त्राचें निर्विकल्पकत्व संपलें. अशा स्थितींत मनुष्याने तर्काची काठी टेकीत जेथवर पल्ला गाठतां येईल तेवढा गाठावा व पूर्ण निर्दोषत्वाचा गर्व मिरवूं नये.

---

## स्त्रियांच्या म्हणी

**(मागील अंकावरून पुढे)**

(३१९) फाटकें लुगडं वाणाचं, मेलेलं माणूस गुणाचं.
(३२०) राजविलासी अन् कोंबडे पलंगाशी.
(३२१) साळसूद बगळा, मासा गिळी सगळा.
(३२२) भरल्या पोटाला उंबर कडू.
(३२३) काम नाही घरीं, सांडून भरी.
(३२४) सुगरण सू डोक्यांत ऊ.
(३२५) विद्या आली हातां, गुरूला मारी लाथा.
(३२६) डोंगराएवढी हाव, तिळाएवढी धाव.
(३२७) मडकें घडवितां येईना, अन् रांजणाचा आव.



अनुक्रमणिका

( ३२८ ) काय पण थाट, अन् पाण्याला फुटका माठ.
( ३२९ ) पाटलाचा घोडा, महाराला भूषण.
( ३३० ) मुक्यांचा बाजार, जीव झाला बेजार.
( ३३१ ) वरमाई छिनाल, तिथं करवल्यांस काय दोष!
( ३३२ ) गड्यासारखें राबावें, घन्यासारखें चाबावें.
( ३३३ ) चांगीचुंगी निरोप सांगी.
( ३३४ ) राजाराणी सुखी, शेजाऱ्याला लाथाबुकी.
( ३३५ ) माणूस पाहून शब्द टाकावा, जागा पाहून घाव मारावा.
( ३३६ ) ऐकलं तर बाळ, नाही तर काळ.
( ३३७ ) हात बाटवावा पण जात बाटवूं नये.
( ३३८ ) आलें मी नांदायला, अन् मडकें नाही रांधायाला.
( ३३९ ) सासू नाहीं घरीं, नणंद जाच करी.

नीळकंठ शंकर नवरे, सोलापूर.

# म्हणी

( १ ) अति खाणं मसणांत जाणं. ( चि० ).
( २ ) आपली हाण, नि जगाची मरमर.
( ३ ) आळशा ( सा ) दुणं काम, नि कृपणा तिणो खर्च. ( चि० ).
( ४ ) आंधळ्याला आमंत्रण, दोघांची तयारी.
( ५ ) उंबरघाट सुटेना, नि कुटुंबकर्ज फिटेना.
( ६ ) एक नकार छत्तीस विघ्नें वारी.
( ७ ) कर नाय तेकां डर कसली? ( कु. ).
( ८ ) करील त्याचें काम, मारील त्याची तलवार, नि शिकेल त्याची विद्या.
( ९ ) करील त्याच्या पाठीवर अधिक गोणी.
( १० ) करीस कां नि कुथस कां?
( ११ ) काडीची सत्ता, नि लाखाची मत्ता.
( १२ ) किती केलं तरी विहिणीचो पापड वांकडो ( चि० ).
( १३ ) खाण्याला आधीं, निजण्याला मधी, नि कामाला कधीबधी.
( १४ ) गर्भाचा नि मेघाचा भाकीत होत नाही. ( चि० )
( १५ ) गाढवाच्या गोणीला सवा खंडीची तूट.
( १६ ) गावताक गोरवां, नि भटाक तारवां. ( कु० )
( १७ ) गांवाचा गंड्या तो सासवेचा देशपांड्या.
( १८ ) गुळाचो गणपती नि तेला गुळाचो नेवेद्य. ( चि० )

(१९) घर सांकड नि बाएल माकड. (चि०)
(२०) घरांत वाजेना सूप, नि बाहेर मिशीला तूप. (चि०)
(२१) घोवाचां मरणां तसां बायलाचां सती जाणां. (चि०)
(२२) घोवांत नाय घोवकी, नि बाएल करी शिंदळकी. (चि०)
(२३) चाखून कोणी रांधीत नाही.
(२४) चोराला भेटे मोर.
(२५) चुलीपुढां हगेवां, नि अदृष्टाला बोल लाववो. (चि०)
(२६) चौघांत मरण लग्नासमान.
(२७) जाती तशी पुती, नि खाण तशी माती.
(२८) जांवयाला दिलां, नि वाळवांत मुतलां (सारखांच). (चि०)
(२९) जामीन न्हाय, नि गाठचें व्हाय. (कु०)
(३०) जिकडे फुडो तिकडे मुलुख थोडो. (कु०)
(३१) झुकलां तां मुकलां. (चि०)
(३२) तळ तुपडी, नि हांडी उपडी.
(३३) दिवस गेलों रेटारेटी, नि दिवो लावनी कापूस वेटी. (चि०)
(३४) दुधाची तान ताकान भागवेची. (चि०)
(३५) दुधान तोंड भाजलां त ताक फुकून प्येवेचां. (चि.)
(३६) देवां तसां घेवां. (चि०)
(३७) धरेवां त चावचे, नि सोडेवां त पळचे.
(३८) धुरावरून अग्नि कळतो.
(३९) नगाऱ्याचे घाय, तिथे टिमकीचें काय ?
(४०) नमन चार घटका, नि कथेचा झाला चुटका.
(४१) नावडतीचें मीठ अळणी, नि आवडतीचें मसण गोड.
(४२) पचेल तां खाय्‌वां नि रुचेल तां बोलेवां. (चि०)
(४३) पळत्याच्या पुढे, नि हाणत्याच्या मागे.
(४४) पळस गेला घाटा, नि तीनच पानें देटा.
(४५) पायांतलो पायपोस पायांत. (चि०)
(४६) पादरेला निमित पावटेचां. (चि०)
(४७) पिके तां विके. (चि०)
(४८) पुढे पाठ, मागे सपाट, नि गुरूचा बोभाट.
(४९) पोटीं नाय पाठीं, नि घराला लागली कांटी.
(५०) फुटली काच, नि गेली पत पुन्हा येत नाही.
(५१) मुकाला कुंडो, नि निजाला घोंडो. (चि०)
(५२) मागीण लेंडार, नि पुढां पेंढार. (चि०)

( ५३ ) माझां माझां, नि भ्रांतीचां ओझां. ( चि० )
५४ ) माझो गांव, नि माकां नाय ठाव. ( कु० )
५५ ) मुख पाहून मुशारा, नि घोडें पाहून खरारा.
५६ ) मे नि माझो नारो, नि परावेचो नाकां वारो. ( चि० )
( ५७ ) मोठां तितकां खोटां. ( चि० )
( ५८ ) मुंगी होऊन साखर खावी, नि हत्ती होऊन लाकडें खावीं.
( ५९ ) म्हशीचीं शिंगां म्हशीला जड नाहीं. ( चि० )
( ६० ) म्हातारो घोव कुकवाक आसरो. ( कु० )
( ६१ ) ये रे कुत्र्या, नि खा माजो डोको. ( कु० )
( ६२ ) राजा करील ती पूर्वदिशा, नि जोशी सांगेल ती अमावास्या.
( ६३ ) राजाची राणी ती पाटलाची मेहुणी.
( ६४ ) राजाची स्वारी, नि मशालजीचा घातवार.
( ६५ ) लटकेचां घर तडवेरीं ( शेवटपर्यंत ) ( चि० )
६६ ) लावली राख, झाली पाक ( शुद्ध ).
६७ ) वराला नाही कळहण, नि करवली मागे वरण.
( ६८ ) वाकड्या मेढीला वाकडें नेम.
( ६९ ) वाऱ्यावर वरात, नि दर्यावर हवाला.
( ७० ) वेळावर वेळ, नि शिमग्याचा खेळ.
( ७१ ) व्याजाचे आशे, नि मुद्दल नाशे.
( ७२ ) शिकेचां सुटलां, नि भोकेचां सापडलां. ( चि० )
( ७३ ) शितावरुटीं भाताची परीक्षा. ( चि० )
( ७४ ) शिमगो गेलो, नि कवित ऱ्हवलें. ( कु० )
( ७५ ) शेळी जाचे जिवानिशीं, नि खाणार म्हणचे वातड. ( चि० )
( ७६ ) सतीचो वसो घेतलेवर कुळे भाजणेचां भय नाहीं. ( चि० )
( ७७ ) सांजचो पाहुणो घर्णा घरी. ( चि० )
( ७८ ) सुजली आंगठी डोंगराएवढी होत नाही.
( ७९ ) सुंभ जळलां तरी पीळ रेहेचे. ( चि० )
( ८० ) हजार भका नि एक लिखा.
( ८१ ) हळखुंडापायीं लगीन मोडलां. ( चि० )
( ८२ ) हातीं धरल्या रोडका, नि शेंडी धरल्या बोडका.
( ८३ ) हातरूण बघनी पाय पसरेवे. ( चि० )

## पुरवणी

१ ) धरशील हिंमत, तर तुला नाही किंमत.

कृ. गो. साठे, देवाचें गोठणें.

## राजापूर प्रांतीय कऱ्हाडे ब्राह्मण— बोलीचा नमुना

( एक सुवासिनी आपल्या मुलीला म्हणते— ) चेडवा, बाळकेस अंघळ घे नि खेळाय् जा. मज बग, आज कामांफुडें इवूली दिखिल फुर्सत नाय्; नि सैपाक लोकर हुइसा हवा. मावशीस अंघळ ये म्हटलें होतें तीव् आली नाय् नि हेच्याफुडें येइलशीव् दिसत नाय्. . गंपा फुलां नि पानां आणाय् गेला अहे, ता अत्तां घटकाभऱ्यांत येइल, नि आलेबराबर भुक भुक करून ओरडाय् लागेल. विठा सडेवर गुरां पोंचवाय् गेला ताव् लोकरच येईल. तेसव् कालचा उपास. आज द्वादशीचा बाह्मण यइचा, नि देवास नेवद्य वाढाय् हवा, ते साठीं भाजी वरण भांत, इवूली तरी खीर, नि एकादी करमट, इतकें तरी कराय् हवें, नि तें ब्राह्मण यइच्या अगोदर हुइस हवें. म्हणून म्हणतों, घे हेस नि जा लोकर. सत्रेच्या नाय् त देवांच्या घरा जा, म्हंजे तेंच्या लेंकरांबराबर खेळत ऱ्हाइल. नि जला निजला तर कुणाकरव् पाळणेंत ठेवव. तेः कसें भ् करून खेळवीत ऱ्हा, रडवूं नको. मी विणी गुंडाळतों, आंगावर पाणी ओततों, नि सैपाकास लागतों. पानां वाढलेबराबर तुज बोलावतों. तुमाः हवें त पांघरूण घेऊन जा. हवें त भिमेसव् घउन जा.

कृ. गो. साठे, देवाचें गोठणें.

---

# रद्दींतील रत्नें*

रत्न १ लें

शोधकः— संपादक

## बापूसाहेब विंचुरकर

ज्ञानोदय, २–५–१८५३

ज्ञानप्रकाशद्वारें आम्हांस समजलें कीं पुणें एथील सदर अमीन रावसाहेब कृष्णराव विठ्ठल ऊर्फ बापुसाहेब विंचुरकर पहिल्या प्रतीचे सरदार यांनी आपली कन्या मुलींच्या शाळेंत शिकायास पाठविली. तर ही गोष्ट मोठी स्तुत्य आहे; कारण असले हे सरदार स्वतां सुधारून सुधारणुकीच्या कामास हात घालतात येणेकरून दुसरे जे प्राचीन रीतीने वागणारे बडे लोक त्यांतीलहि कित्येक यांचें उदाहरण घेऊन सुधारतील. थोडयाच वर्षांमागें जर सदर्हू बडे लोकांप्रमाणें कोणी मुलगी शाळेंत पाठविली असती तर त्यास वेड लागलें असें दुसरे लोक बोलते, परंतु आतां तो समय जाऊन प्रकाशाच्या आरंभाचा समय लागल्यामुळें उपहास न होतां सुधारणुकीचा पुढारीपणा असें फळ प्राप्त आहे.

---

* ह्या सदराबद्दलचा खुलासा अन्यत्र वाचावा.

# सर महमद इक्बाल

## उर्दू व फारसी प्रतिभावान कवि

हिंदी मुसलमानांतील जातवार प्रतिनिधत्वाचे पुरस्कर्ते व पंजाब प्रांतातील एक पुढारी अशी सर महमद इक्बाल यांची ख्याति पुष्कळांनी ऐकली असेल. पण इक्बाल हे राजकारणांत लुडबुडणारे गृहस्थच नसून उर्दू व फारसी या दोन्ही भाषांचे प्रतिभावान कवि आहेत हें त्या भाषा जाणणारांव्यतिरिक्त इतरांना क्वचितच माहीत असेल. इक्बाल यांचीं राजकीय मतें कांही असलीं व त्यांजबरोबर कोणाचा किती जरी विरोध असला तरी उर्दू व फारसी भाषांचा अभ्यासक अशा प्रत्येक गृहस्थाला कवि या दृष्टीने इक्बालांचें महत्त्व मान्य केल्यावांचून गत्यंतर नाही. इक्बालांचें राजकारण जरी फार वेळ टिकणारें नसलें तरी त्यांची काव्यकृति उर्दू व फारसी वाङ्मयांत कायम राहून आपल्याबरोबरच इक्बालांना अजरामर करील याविषयीं फारसा मतभेद शक्य नाही.

गेल्या पाव शतकांतील उर्दू काव्यांत इक्बालांनी आपल्या काव्यशक्तीने एका नवीन मनूस सुरवात केली व त्यांच्या पावलावर पाऊल ठेवून चालणारे कवि आता उर्दू भाषेंत पुढे येऊं लागले आहेत असें म्हटल्यास त्यांत विशेष अतिशयोक्ति होणार नाही. इक्बालांनी आपल्या काव्याने मुसलमान समाजांत व विशेषतः तरुण वर्गांत जागृति उत्पन्न केली व त्यांच्यांतील धार्मिक भावना व देशप्रेम यांस उत्तेजन दिलें.

इक्बालांचा जन्म एकोणिसाव्या शतकाच्या अखेरीस पंजाबांतील सियालकोट शहरीं झाला. मॅट्रिक व एफ्. ए. पर्यंतचें शिक्षण सियालकोट येथेच झालें. पुढील शिक्षणाकरिता त्यांस लाहोर येथे जावें लागलें. त्यांच्या काव्यप्रतिभेस विसाव्या शतकाच्या सुरवातीस तेथेच चालना मिळाली व हळूहळू उर्दूंतील त्या काळच्या उच्च कवींत त्यांची गणना होऊं लागली. लाहोर येथील शिक्षणक्रम संपवून इक्बाल उच्च शिक्षणाकरिता आधी इंग्लंडला व तेथून जर्मनीस गेले. परदेशांत असतांहि त्यांचा काव्याचा व्यासंग चालू राहिला. मात्र फारसी भाषेचा व तत्त्वज्ञानाचा अभ्यास जसजसा वाढत गेला तसतसा इक्बालांचा ओढा फारसीकडे वाढत गेला व शेवटीं त्यांनी उर्दू काव्याला कायमची तिलांजली दिली.

आजपर्यंत इक्बालांनी ज्या उर्दू कविता लिहिल्या त्यांचा संग्रह 'बांगेदरा' (घंटा—नाद) या नांवाने प्रसिद्ध झाला आहे. आपल्या काव्यसंग्रहाला हें नांव देण्यांत इक्बालांचा हेतु असा दिसतो की, सकाळच्या प्रहरीं काफला आपल्या मुक्कामावरून पुढे जाण्यास सज्ज झाला म्हणजे घंटेच्या नादाने जसें काफल्यांतील लोकांना जागृत

करण्यांत येतें त्याच रूपाने आपला हा काव्यसंग्रह निद्रित समाजाला खडबडून जागा करून प्रगतिपथ आक्रमावयास लावील.

इकबालांच्या या काव्यसंग्रहांत ज्या कवितांचा समावेश झाला आहे त्यांचे कालमानाने तीन भाग पाडतां येतील. एक आरंभापासून १९०५ इ. पर्यंतचा काळ. हा काळ म्हणजे ऐन तारुण्याचा व विद्यार्थिदशेचा. १९०१ च्या एप्रिल महिन्यांत लाहोरहून शेख अबदुल कादिर, बार. ॲट. लॉ. ( आता सर अब्दुल ) यांच्या आधिपत्याखाली सुरू झालेल्या "मखजन" या मासिकाच्या प्रथमांकांत इकबालांची पहिली कविता प्रसिद्ध झाली. या कवितेचा विषय " हिमालय पर्वत " हा होता. हिमालयाच्या हिमाच्छादित शिखरांचें, त्यांतून वाहणाऱ्या नद्यांचें व सुंदर वनश्रीचें इकबालांनी जें रसाळ वर्णन केलें आहे व या कवितेच्या प्रत्येक ओळींत हिंदभूमीविषयी जो आदर व्यक्त केला आहे त्यावरून इकबाल म्हणजे मामुली कवि नसून एक उत्कट स्वदेशाभिमानी कवि आहेत अशी लोकांना खात्री पटली. पुढे "मखजन" मासिकांत इकबालांच्या कविता वरचेवर प्रसिद्ध होत गेल्या व काव्यप्रसिद्धीबरोबर इकबालांच्या प्रसिद्धींतहि भर पडत गेली.

राष्ट्रीयत्वाची कल्पना ज्या कवितांत ओतप्रोत भरली आहे अशा अनेक कविता इकबालांनी या काळांत लिहिल्या. त्यांतच त्यांचे सर्वतोमुखीं झालेलें राष्ट्रगीत " सारे जहांसे अच्छा हिंदोस्तां हमारा " हेंहि आहे. पण काव्य या दृष्टीने याहूनहि उच्च अशी इकबालांची कृति म्हणजे " नया शिवाला " ( नव–मंदिर ) या नांवाने त्यांनी लिहिलेली कविता होय. या कवितेंतील फक्त एकच ओळ इकबालांच्या त्या काळच्या जाज्वल्य देशभक्तीची खात्री पटविण्यास पुरेशी आहे. दगडमातीच्या मूर्तींची पूजा करणाऱ्या ब्राह्मणास उद्देशून इकबाल म्हणतात:—

पथ्थरकी मूरतोंमें समझा है तूं खुदा है ॥
खाके वतनका मुझको हर जर्रा देवता है ॥

( " हे ब्राम्हणा, तुला असें वाटतें की, दगडांच्या मूर्तींत ईश्वर संचार करितो व तूं त्यांना भजतोस पण मला तर मातृभूमीच्या मातीचा प्रत्येक कण देवतेसमान वाटतो. " )

इकबालांच्या काव्यलेखनाचा दुसरा काळ म्हणजे १९०५ ते १९०८ हीं तीन वर्षें. हा काळ इकबालांनी विद्यार्थी म्हणून परदेशीं घालविला. तेथेच त्यांनी उर्दू बरोबर फारसी काव्यलेखनास सुरवात केली.

१९०८ नंतर इकबालांनी ज्या कविता केल्या त्यांत इकबालांच्या पान इस्लामिक ( Pan Islamic ) मतांचा प्रभाव विशेष दिसतो. या काळांत इकबालांची दृष्टि फक्त हिंदुस्थानावरच खिळून न राहतां साऱ्या इस्लामी जगावर पडूं लागली व आशिया खंडाच्या आणि त्यांतूनहि इस्लामी जगाच्या पुनरुज्जीवनाची

चळवळ कशी शक्य होईल या प्रश्नाकडे त्यांचें लक्ष वेधलें. याच काळच्या काव्यांत त्यांचीं " शिकवा " ( तक्रार ) व " जबावे शिकवा " ( तक्रारीचा जाब ) हीं दोन काव्यें प्रसिद्ध झालीं. यांतील पहिल्या काव्यांत इकबालांनी मुसलमान समाजाच्या सद्यःस्थितीचें चित्र रेखाटून इस्लामी इतिहासाच्या वैभवकाळाच्या स्थितीशीं सद्यःस्थितीची तुलना केली आहे व एके काळीं ज्याने प्रगतिशिखर गांठलें होतें तोच समाज आज इतक्या दारुण स्थितीला जावा याबद्दल तक्रार केली आहे. " जबावे शिकवा " या काव्यांत इकबालांनी आपणच केलेल्या तक्रारीचें ईश्वराच्या तोंडून उत्तर दिलें आहे व मुसलमानी समाजाच्या अधोगतीचीं कारणें उत्तम रीतीने वर्णन केलीं आहेत. या दोन काव्यांनी इकबालांच्या ख्यातींत अतिशय भर टाकली व त्यांचें नांव उर्दू जाणणाऱ्या समाजांत सर्वतोमुखीं झालें.

याच काळांत इकबालांनी " तारानए मिल्ली " ( इस्लामी राष्ट्रगीत ) म्हणून काव्य लिहिलें व एके काळीं हिंदुस्थानचे गुण गाणारा कवि

" चीनो अरब हमारा हिंदोस्तां हमारा ॥
" मुस्लिम हैं हम वतन है सारा जहां हमारा ॥

असें म्हणूं लागला. या काळांत इकबालांनी लिहिलेल्या इतर काव्यांत " तुलुए इस्लाम " ( इस्लामचा उदय ) व " खिजरे राह " ( मार्गदर्शक ) हीं दोन मोठीं काव्यें आहेत. या दोन्ही काव्यांत इकबालांचे पान इस्लामिक विचार पूर्णपणें दृष्टीस पडतात. " खिजरे राह " या काव्यांत इकबालांनी साम्राज्यशाहीचा व भांडवलशाहीचा जोराने निषेध करून भविष्यकाळ मजूरवर्गाकरिता आहे असें भाकित केलें आहे.

इकबालांच्या मतांत जरी मोठा फरक झाला तरी त्याचा अर्थ असा मात्र करतां येणार नाही की, त्यांच्या अंगीं धार्मिक असहिष्णुता उत्पन्न झाली. कारण याच काळांत त्यांनी श्रीरामचंद्र, गुरु नानक इत्यादि महात्म्यांबद्दल अत्यंत भक्तिपर कविता लिहिल्या.

इकबालांच्या उर्दू काव्यापेक्षा त्यांचें फारसी काव्य अधिक आहे. फारसी भाषेंतील इकबालांचें पहिलें काव्य म्हणजे " असरारे खुदी व रमूझे बेखुदी " हें होय. हें काव्य तत्त्वज्ञानविषयक असून त्यावरून इकबालांना इस्लामी इतिहास व संस्कृतीविषयी वाटणारा अभिमान व्यक्त होतो.

इकबालांचा दुसरा फारसी काव्यग्रंथ म्हणजे " पयामे मशरिक " ( पूर्वेचा संदेश ) हें काव्य जर्मन कवि गोएटेस उत्तर म्हणून इकबालांनी लिहिलें. इकबालांचा तिसरा फारसी ग्रंथ म्हणजे " जबूरे अजम ".

इकबालांच्या फारसी काव्याने हिंदुस्थानाबाहेरहि इकबालांना प्रसिद्धी मिळाली. विशेषतः फारसी भाषाकोविद पाश्चिमात्य पंडितांत त्यांस मान मिळूं लागला.

गालिब ह्या एकोणिसाव्या शतकांतील उर्दू महाकवीनंतर उर्दू भाषेवर पूर्ण प्रभुत्व गाजविणारे असे कवि म्हणजे इकबालच होत. इकबालांनी अवघ्या दहा पंधरा

वर्षांच्या काव्यव्यासंगानंतर उर्दूंत काव्यरचना करणें सोडून द्यावें हें उर्दू भाषेचें मोठेंच दुर्दैव. उर्दू भाषेंत कवींची संख्या वरीच मोठी आहे व उच्च कोटीचे कवीहि कमी नाहींत; पण कवि या दृष्टीने जी लोकप्रियता इकबालांच्या वाट्यास आली ती इतर कोणत्याहि उर्दू कवीस प्राप्त झाली नाही. "बांगे दरा"ची पहिली आवृत्ति १९२४ सालीं प्रसिद्ध झाली. त्यानंतरच्या गेल्या आठ वर्षांत या काव्यसंग्रहाच्या हजारों प्रति प्रसिद्ध होऊन उर्दू भाषा जाणणाऱ्या समाजांत हिंदुस्थानभर पसरल्या आहेत.

इकबालांची कर्तृत्वशक्ति जर त्यांच्या काव्यशक्तीइतकीच दांडगी असती व त्यांनी स्वतः ज्या मतांचे गोडवे गाइले आहेत त्यांप्रमाणे ते वागले असते तर खात्रीने इकबालांना हिंदी मुसलमानांचें पुढारीपण प्राप्त झालें असतें. पण इकबालांनी स्वतःचा आपल्या "बांगेदरा" या ग्रंथाचा शेवट पुढील ओळींत केला आहे.

(१) इकबाल बडा उपदेशक है
मन बातोंमें मोह लेता है ॥
(२) गुफतारका गाझी बन तो गया
किरदारका गाझी बन न सका ॥

इकबाल मोठे रसाळ उपदेशक आहेत व आपल्या बोधामृताने वाचकांचीं अथवा श्रोत्यांचीं मनें मोहून टाकतात. पण ते जसे बोलके आहेत तसे कर्ते मात्र नाहींत.

फरिश्ता

---

# संस्कृति व साहित्य यांजमधील स्थित्यंतरें

## संस्कृतीची व्याख्या

जीवनांतील एकंदर अनुभवावरून जनतेच्या मनोधर्मांवर जो परिणाम होतो किंवा संस्कार होतो तीच संस्कृति. संस्कृति प्रांतभेदाने व भाषाभेदाने बदलते. उदाहरणार्थ, इटलींतील प्राचीन रोमन संस्कृति, ग्रीस देशांतील ग्रीक संस्कृति, ईजिप्तांतील सुमेरी संस्कृति इत्यादि अनेक संस्कृती एके काळीं राजाश्रयाच्या व लोकाश्रयाच्या जोरावर वैभवाच्या कोंदणांत चमकत होत्या. परंतु त्यांचें तें उज्ज्वल तेज आज कोठे आहे? त्या स्मृतिशेष म्हणण्यापेक्षा कीर्तिशेष झाल्या असें म्हणणें ज्यास्त उचित होईल. या संस्कृतींत कित्येक साम्यस्थळें असतील. परंतु त्या त्या देशांतील व कालांतील लक्षणें व इतिहास यांना अनुसरून त्यांत महत्त्वाचे फरक असे असणारच. त्यांतील मुख्य तत्त्व सामान्यतः एकच असलें तरी त्यांचे घटक निरनिराळे होत. बीजगणितांत जसें एखाद्या संख्येपासून निरनिराळ्या अवयवांच्या जोड्या काढितां येतात तद्वत् संस्कृतींच्या

निरनिराळ्या घटकांच्या पृथक्करणाविषयीं कांहीशी कल्पना करतां येईल. महाराष्ट्रदेशांतील हवापाणी, राजकीय व सामाजिक परिस्थिति, जनतेच्या अडचणी यांस अनुलक्षून जो अनुरूप मतप्रसार व नीतिधर्मांची शिकवण करणें तुकाराम–रामदासांसारख्या संत विभूतींना अवश्य वाटलें, आणि महाराष्ट्रभाषेच्या योगानें जो उपदेश महाराष्ट्रांतील सामान्य जनसमूहाला पटला आणि ज्याचा त्यानें आपल्या आचार-विचारांत आस्थेनें समावेश केला, तीच महाराष्ट्रीय संस्कृति होय असें स्थूलपणें म्हणतां येईल. जी गोष्ट महाराष्ट्राची उदाहरणदाखल घेतली तीच स्थूल मानानें जगांतील इतर संस्कृतींनादेखील तितकीच लागू आहे. संस्कृतीची लहानशी ठिणगी मतप्रसार करणाऱ्या थोर व अधिकारी आचार्यांकडून म्हणा, किंवा महान् साधुसंतांकडून म्हणा, चेतविण्यांत येते खरी. पण तिची वाढ व विस्तार झाल्याशिवाय जनतेची सर्वांगीण प्रगति होणें कठीण. म्हणून संस्कृतीची वाढ कशी काय होते हें पाहणें उद्बोधक होईल.

## संस्कृतीची वाढ कशी होते ?

संस्कृतीची वाढ कशी होते ? याचें थोडक्यांत उत्तर असें की, खेड्यांतील जीवनाचा तो एक आवश्यक घटक बनल्यानें. हिंदुस्थानांत तरी संस्कृतींची वाढ प्रथम ग्रामजीवनांत झाली आणि तेथून ती पुढे शहरांकडे पसरली. हिंदुस्थानांत प्राचीनकाळीं ज्या विविध संस्कृती अस्तित्वांत आल्या त्या सर्व निरूपणपद्धतीनेंच ! आजच्या इतका सार्वत्रिक साक्षरतेवर तेव्हा भर नव्हता. मुद्रणयुगाचें सौकर्यहि तेव्हा अर्थातच नव्हतें. समाजाला साक्षरतेपासून अनेक फायदे आहेत खरे. पण निवळ साक्षरतेपेक्षाहि ज्ञानतत्त्वांसंबंधी जिज्ञासेची ‘ अंतरींची तळमळ ’ जर प्रथम जनतेंत उत्पन्न झालेली असेल तर तिच्या मनोधर्मांत कोणत्याहि अनुरूप संस्कृतीचें ठाणें पक्कें बसणें जास्त सुलभ आणि म्हणून तें पुढे शाश्वतहि होतें. याचें एक स्थूल कारण असें की, पुष्कळ व विविध विद्या शिकूनहि मानवी जीवनास आवश्यक अशीं मूलतत्त्वें सर्वांसच सुगम होतील असें म्हणतां येणार नाही ! ग्रंथ हे ‘ परोक्ष गुरु ’ असले तरी, त्यांच्या वाचनानें उपलब्ध ज्ञानांत अधिक भर पडत असली तरी, तेणेंकरून सर्व संशय फिटत नाहीत. अर्थात् तितक्या प्रमाणांत संस्कृतिप्रसाराचें कार्य लंगडें पडतें. म्हणून जीवनविषयक व धर्मविषयक मूलतत्त्वें प्रेमानें समजावून सांगणारे गुरूच आपापल्या प्रांतापुरती किंवा टप्प्यापुरती विशिष्ट संस्कृतीची वाढ करण्यास समर्थ होतात. उदाहरणार्थ, शिवाजी महाराजांच्या काळीं मुसलमानी राज्याच्या वरचष्म्यामुळे व राजकीय, सामाजिक, आर्थिक अशा सर्वांगीण दास्यामुळे महाराष्ट्रीय जनतेच्या जीवनांत एक प्रकारचें मालिन्य व औदासीन्य प्राप्त झालें होतें. त्याचें निवारण करून महाराष्ट्रीय संस्कृतीचें दिव्य आत्मतेज दाखविण्याचें प्रचारकार्य रामदास महाराजांनी केलें. तात्पर्य, आगीवर राख साचावी तशी कित्येकदा जनांगांच्या मनोधर्मांची स्थिति होते. स्वकीय व स्वायत्त संस्कृतीविषयी योग्य अभिमान त्यांस नसतो असें नाही. परंतु अज्ञानाच्या मोहनिद्रेंतून खडबडून जागें करून त्यांच्या निजस्वरूपाची जाणीव जे महात्मे, आचार्य किंवा साधुसंत करून देतात, तेच त्या त्या ‘ संस्कृतीचे पाईक ’ बनतात. हिंदुस्थानांत शहरांपेक्षा खेड्यांचीच संख्या कितीतरी पटींनी जास्त असल्यामुळे त्यांतील विविध संस्कृतींची वाढ प्रथम खेड्यापाड्यांतून झाली. पूर्वकाळीं खेड्यांतील एखाद्या देवस्थानासारख्या सार्वत्रिक

ठिकाणांतून संस्कृतीची वाढ होणें फार सुलभ होत असे म्हणून पुराण, श्रवण, कीर्तन, कथा-निरूपण, स्वाध्याय यांच्या योगाने खेडयांतील समाजाच्या सर्व घटकांत त्या त्या संस्कृतीविषयी आपलेपणा वाढत गेला आणि उत्तरोत्तर त्यास त्यांच्या आस्तिक्यबुद्धीची व श्रद्धेची जोड मिळून संस्कृतीचें पाऊल प्रगतीच्या दृष्टीने पुढे पुढ पडूं लागलें. ग्रामजीवनांतील निरनिराळ्या घटकांचा एकमेकांशीं नित्य संबंध येत असतोच. अशा वेळीं संस्कृतीचे दुवे न कळत जोडले गेले आणि कालांतराने तिची प्रतिष्ठा स्थिर झाली. व्यवहारांतहि असा अनुभव येतो कीं, आपल्यापाशींच एखाद्या गहन तत्त्वाचें मनन करण्यापेक्षा त्याचें पंडितांकडून झालेलें विशदीकरण ऐकण्यांत श्रोत्यांस फार कमी श्रम पडतात आणि म्हणून मन फार प्रसन्न व ताजेंतवानें राहतें. हिंदुस्थानांत आर्यसंस्कृतीचा प्रसार होतांना या निरूपणपद्धतीचा विशेष अवलंब करण्यांत आला, आणि तेणेंकरून ती ग्रामजीवनांतील ज्ञानप्रसाराचें एक प्रधान अंग होऊन बसली आणि अनुषंगाने जनतेची नीतिमत्ता व शील यांत जास्त विशुद्धि होत गेली.

## संस्कृति-साहित्याला राजाश्रयाची जरूरी

कोणत्याहि गोष्टीला राजाश्रयाची अत्यंत जरूरी लागते. त्या योगें तिचा उत्कर्ष सुगम, सुकर व शीघ्र होतो. हीच गोष्ट संस्कृतीच्या प्रसारासहि अर्थातच लागू पडते. हिंदुस्थानांत नांदलेल्या संस्कृतींपैकीं बौद्ध संस्कृतीचेंच उदाहरण जरी घेतलें तरी असें दिसून येतें कीं, भगवान गौतमबुद्धाने स्थापन केलेली ही अहिंसात्मक संस्कृति प्रतापी अशोक राजाच्या कालकीर्दी-नंतर फार काळ टिकली नाही ! अशोक चंद्रगुप्तांचा वैभवशाली राजाश्रय जोंकालपर्यंत या संस्कृतीला पोषक होता, तोंकाळपावेतों तिचा प्रसार हिंदुस्थानांतच काय, पण चीन, जपान, जावा, सुमात्रा, कांबोदिया इत्यादि पूर्वेकडील बेटांतहि जोराने जारी झाला. परंतु दक्षिणेंत आद्य शंकराचार्यांनी बौद्ध मताचें खंडन करतांच पुनः सनातन हिंदुधर्माचें वैदिक तेज तळपूं लागलें आणि त्याला असलेला राजाश्रय उलट वैदिक धर्माच्या प्रसाराकरिता राबूं लागला. अर्थात् बौद्ध संस्कृतीच्या वाढत्या उत्कर्षाला पायबंद बसून पुन्हा प्राचीन हिंदु संस्कृतीची प्रतिष्ठापना झाली, आणि बौद्ध संस्कृतीप्रमाणेच हिंदु संस्कृतीच्या प्रसारार्थ वक्ते, कवी, नाटककार व हरिकथानिरूपक राजाश्रयाच्या पाठबळामुळे एकदम पुढे सरसावले. उदाहरणार्थ, कर्नाटकी साहित्य-संस्कृतीकडे अवलोकन केल्यासहि उचित राजाश्रयामुळे कार्याचे केवढाले डोंगर किती झपाट्याने उभारतां येतात याचा पुरावा सांपडतो. कर्नाटकी साहित्याच्या सुरवातीस चांगले व व्युत्पन्न कवी जैन मताचे होते. याचें कारण त्या वेळीं कर्नाटकांत जैन राजांची वैभवशाली कारकीर्द गाजत होती हें होय ! राज्यांतील शांततेच्या काळांत चांगले चांगले जैन राजे स्वतः साहित्यसेवक, तत्त्वजिज्ञासू व उत्कृष्ट कवी होण्याचा ध्यास धरीत असें आढळतें. किंबहुना त्यांपैकीं कित्येक उत्कृष्ट कवी म्हणून प्रसिद्ध आहेत. आता खुद्द राजा जेथे साहित्य-संस्कृतीच्या प्रसाराकरिता इतक्या आस्थेने जातीने लक्ष घालीत असतो तेथे सामान्य संस्कृति-साहित्य-प्रसारकांनाहि किती व कसें सक्रिय उत्तेजन मिळत असेल, आणि अशा विद्वान व विद्वत्वाची चाड असणाऱ्या राजांची मैत्री जोडून संस्कृतिप्रसाराच्या काव्यकथा-निरूपणादि मार्गांनी त्यांस तोषविण्याची अशा प्रचारकांत कशी चढाओढ लागून राहिलेली असेल याची आजहि

कांहीशी पुसट कल्पना करतां येईल. संस्कृतीच्या उगमालाच तेवढी राजाश्रयाची जरूरी असते असें नाही. सनातन धर्माचीं नीतितत्त्वें सुंदरपणें गोवलेलीं वचनें व काव्यें एखाद्या कवीनें रचलीं आणि तीं ऐकून एखाद्या विद्वान राजानें त्याचा योग्य तो गौरव केला आणि त्यास इनाम दिलें एवढयानें संस्कृति व साहित्य यांची खरी वाढ होत नाही! नीतितत्त्वें कवीला, राजाला आणि तेथून फार तर त्याच्या आख्यानांतील आस्वादेच्छु शात्यांना कळलीं किंवा वळलीं म्हणून संस्कृतीच्या प्रसाराची चलती होत नाही. कवीपासून राजाला, राजापासून अधिकाऱ्यांना, तेथून नगरांतील व ग्रामांतील साऱ्या जनांगांना अशा क्रमानें हीं संस्कृतींतील नीतितत्त्वें उत्तरोत्तर सबंध ग्रामजीवनाशीं जोंपर्यंत निगडित व एकरूप होत नाहीत, तोंपर्यंत ती संस्कृति पसरत नाही आणि तिची वाढ होत नाही! हें प्रचंड व अविरतपणें करण्याचें कार्य एकटयाकडून किंवा व्यक्तिगत स्वार्थत्यागापासून कसें होणार? म्हणून ग्रामजीवनांतील झाडून सारे घटक म्हणजे शेतकरी, मजूर, शिंपी, लोहार इत्यादि साऱ्या कर्मकाऱ्यांच्या नित्याच्या आयुष्क्रमांत आणि तेथून त्यांच्या मनोवर्मांत या संस्कृतीच्या भलेपणाचा प्रचंड जाहीर घोष,एकाच वेळीं व्हावयाचा असेल, तर तो राज्यांगांतील वरील घटकांकरवी झाला पाहिजे हें उघड होय. अशी कल्पना करूं की, शेतकऱ्यासारख्या एखाद्या अज्ञ मनुष्यास संस्कृतींतील नीतितत्त्वें हेरून तीं उकलतां यावीं अशी स्थिति निर्मावयाची आहे पण ती निर्मिण्यास त्याच्या घरीं जाऊन, त्याच्या फुरसतींत, त्याच्या भाषेंत सोप्या पद्धतीनें उपदेश करणाऱ्या कळकळू प्रचारकांची फार जरूरी आहे.अशीं हजारों खेडीं दर प्रांतांत आहेत. म्हणून खेडयांतील अज्ञ व निरक्षर लोकांची एकंदर स्थिति सुधारण्यासाठी अशा अनेक प्रचारकांची हेतुपूर्वक योजना झाली पाहिजे हें उघड आहे. परंतु अनुभव असा असतो की, असे श्रीमंत पण अत्यंत स्वार्थत्यागी प्रचारक मिळणें फार कठीण! तरीहि खेडयांची संघटना व त्यांच्या जीवनांत इष्ट ती सुधारणा करणें केव्हांहि जरूरीचें असल्यामुळे, असे पगारी प्रचारक नेमणें व एखादें स्वतंत्र खातें उघडून त्याच्याकरवी त्यांच्या कामकाजावर योग्य ती देखरेख करणें अतिशय जरूरीचें असतें. आणि हें प्रचंड कार्य एकटया व्यक्तीकडून होणें अशक्य असल्यामुळे त्याला पदोपदीं राजाश्रयाची जरूरी भासते. तात्पर्य, संस्कृतीचा व तिच्याद्वारें साहित्याचा प्रसार खेडयापाडयांतून समाजाच्या सर्व घटकांतून—सर्व थरांतून—झाला पाहिजे. आणि हा प्रसार उत्कृष्ट, निर्दोष व सत्वर व्हावयाचा असेल तर तो फिरत्या प्रचारकांनी "फिरत्या साहित्याच्या" म्हणजे उपदेश-निरूपणाच्या रूपांनी निरलसपणें व स्वार्थत्यागपूर्वक केला पाहिजे. म्हणून संस्कृति, साहित्य व राजसत्तेचें पाठबळ या त्रिवेणीसंगमाची किती व कशी जरूरी आहे याची कांहीशी कल्पना येईल.

## संस्कृतीच्या प्रसारांत फरक

पूर्वी ग्रामजीवनाचें एक अत्यंत महत्त्वाचें उपांग म्हणून संस्कृतीचा व साहित्याचा प्रथम खेडयांतून उगम व प्रसार होत असे. परंतु आजकाल पाहावें तों मुद्रणयुगाचें सौकर्य इतकें परमावधीनें वाढलेलें दिसतें की, छापील वर्तमानपत्री वाङ्मयाचे अजस्र भारे, नाटकें, चित्रपट, बोलपट इत्यादि विविध साधनांच्या योगानें विदेशीय संस्कृतींचा प्रसार हिंदुस्थानांत फार झपाट्यानें होत असून तिचें सर्रास अंध अनुकरण जपानसारख्या पौर्वात्य देशाकडूनहि होत

आहे. पूर्वी अशी स्थिति असे की, संस्कृतीचा उगम प्रथम खेड्यांत होई, आणि तेथून राजाश्रय हुडकीत हुडकीत ती राजधानीकडे धाव घेत असे. आजची स्थिति उलट आहे. आज पाश्चात्य संस्कृतीचा उगम व प्रसार न्यूयॉर्क, लंडन, पॅरिस, बर्लिन अशा राजधानीच्या मोठमोठ्या शहरांतून प्रथम होतो; परंतु खेड्यांतून तिचा तशाच जोमाने प्रसार व प्रचार करणाऱ्या आस्थेवाईक प्रचारकांची तेथे वाण भासूं लागली आहे. म्हणून ती शहरांतील कृत्रिम मानवी जीवनाचें एक प्रमुख अंग होऊन बसली आहे. परंतु ती समाजांतील सर्व थरांचा म्हणजे ग्रामजीवनाचा संपूर्ण ठाव घेण्यास अजून समर्थ झालेली नाही! म्हणून कित्येक वर्षांपासून रस्किनसारख्या पाश्चात्य विचारवंतांत याविरुद्ध प्रतिक्रियेची मोठी मानसिक क्रांति झालेली आहे. " Back to nature, back to villages ", ( पुन: निसर्ग व खेडीं यांचा आश्रय करूं या ) अशी कौंट लियो टॉलस्टॉय, कार्लाईल, इमरसन, रस्किन, लॉंगफेलो आदि तत्त्ववेत्त्यांची जाहीर घोषणा पाश्चात्य जनतेच्या कानांवर जोराने आदळली असून त्यांच्या आचारविचारांत तेणेंकरून फार मोठी क्रांति झालेली आहे. आणि ग्रामजीवनांतील शुचिता, पावित्र्य,आनंद,समाधान व एकान्त यांचा पुरेपूर आस्वाद घेण्याकरिता यंत्रमय व गजबजलेल्या मोठ्या शहरांत राहून राहून कंटाळलेली तेथील जनता अत्यंत उतावीळ झालेली आहे. तेव्हा हें संस्कृतीचें एक स्थित्यंतरच होय असें म्हणण्यास हरकत नाही!

## संस्कृतीचा ऱ्हास

कोणतीहि संस्कृति तिच्यांतील गुणांच्या किंवा दोषांच्या अतिरेकामुळे नाश पावते. प्राचीन ग्रीक लोक उच्च प्रतीचे कलाभ्यासी व वाचनाचे मोठे शोकी होते. याचा परिणाम असा झाला की, कालांतराने त्यांच्यांतील लढाऊ गुणधर्म कमी कमी होत जाऊन त्यांची संस्कृति अस्ताला जाण्याच्या पंथाला लागली. तसेंच एके काळीं रोमन संस्कृतीहि विद्येचें, वैभवाचें व पराक्रमाचें माहेरघर होती. परंतु पुढे पुढे यांचा अतिरेक होत जाऊन सुखविलास व ऐषआराम यांतच मोठमोठ्या शूर रोमन सरदारांचें आयुष्य फुकट जाऊं लागलें. हिंदुस्थानांतील डाक्क्याची उंची व अत्यंत तलम मलमल आणि दक्षिण हिंदुस्थानांतील रत्नें व वैडूर्यें यांच्याशिवाय मोठमोठ्या सरदारांच्या सभा व समारंभ अडूं लागले आणि प्लिनीसारख्या त्या वेळच्या इतिहासकाराला या ' महाग ' शोकाबद्दल जाहीरपणें उद्वेगाचे निःश्वास सोडावे लागले. याचा पुढे असा परिणाम झाला की, रोमन राज्यव्यवस्थेंत बेबंदशाही माजली; आणि रानटी व क्रूर हूण लोकांच्या टोळधाडीपुढे रोमचें अत्यंत वैभवशाली साम्राज्य अस्ताला गेलें. कोणतीहि संस्कृति काय किंवा साहित्य काय, आलस्याच्या किंवा अकर्माच्या चिखलांत रुतल्यास, किंवा स्थितिशील बनूं लागल्यास, त्याचा नाश जवळ ओढवतो असा इतिहासांतील अनुभव आहे. म्हणून संस्कृतीचा विकास व परिपोष व्हावयाचा असेल तर ती घड्याळांतील लंबकाप्रमाणे सदा गतिमान राहून कालाच्या लाटेच्या ओघाप्रमाणे परिस्थितिबरहुकूम बदलली पाहिजे. म्हणजे तिच्या मूलतत्त्वांत बदल न झाला तरी प्रतिक्रियेच्या तपशिलांप्रमाणें तिने बदलत्या काळाच्या लाटेला योग्य वेळीं सावधपणें बगल दिली पाहिजे. तरच ती तगेल व जगेल. बौद्धधर्मांत वेळीं अवेळीं अहिंसा व सक्तीचा संन्यास यांचा पुरस्कार जेव्हा अतिरेकाला पोंचला

तेव्हा त्याचा अस्त झाला. आजहि आमची हिंदु संस्कृति वैदिक धर्मातील मूळ उज्ज्वल शिकवणीस पारखी झालेली आहे. तिला मूल धर्माच्या उदार तत्त्वांचा विसर पडला असून तिने त्यांजकडे कानाडोळा केला आहे आणि केवळ रूढिगत तपशिलांच्या गतानुगतिक बंधनांनी ती जखडली गेल्यामुळे, वरकरणीं तरी पाश्चात्त्य भौतिक संस्कृतीची तिजवर मात झाली आणि ही तिची पकड अजूनहि सुटलेली नाही. केवळ शुद्ध ज्ञानाची महती वर्णन करून सांगण्यांत आणि थोर, पराक्रमी पूर्वजांच्या निष्फळ गुणवर्णनांत चालू पिढीचा काल जाऊं लागला आणि संस्कृतीच्या प्रसाराचें प्रत्यक्ष विधायक कार्य तिच्याकडून फारसें होईनासें झालें.

## चिकित्साबुद्धीचा उदय

युरोपखंडांत ख्रि. शकाच्या १६ व्या शतकांत चिकित्सेच्या युगाचा प्रारंभ झाला आणि तेणेंकरून पाश्चात्त्य जनतेस श्रद्धेबरोबरच विवेकाचें व चिकित्सेचें महत्त्व पटत चाललें. याचा परिणाम असा झाला की, त्यांना शुद्ध ज्ञानाबरोबरच विज्ञानाची म्हणजे भौतिक शास्त्रांची महती व जरूरी पटली. त्या काळापासून त्या खंडांतील बुद्धिमान शोधक विज्ञानशास्त्रांत महत्त्वाचे शोध लावूं लागले आणि मानवी जीवनांतील सौकर्यांत मोठी क्रांति घडवून आणूं शकले. आत्मज्ञान मिळवून एखाद्या महात्म्याकडून वैयक्तिक किंवा फार तर कांही थोड्या शिष्यांची मुक्ति साधितां येईल. परंतु पाश्चात्त्य संस्कृतींत चिकित्सायुगाच्या उदयामुळे जी प्रचंड नवीन स्फूर्ति उत्पन्न झाली तेणेंकरून त्यांचें लक्ष्य व्यक्तीच्या उद्धारापेक्षा उत्तरोत्तर सबंध समाजाच्या उद्धाराकडे अधिक वेधूं लागलें आणि सूक्ष्म विचारांतीं असें खास म्हणतां येईल की, शुद्ध ज्ञान्याची बुद्धि जितकी कुशाग्र व निःस्वार्थी, तितकीच पाश्चात्त्यांचीहि समाजसेवेची तळमळ अलौकिकच होय! तात्पर्य, आधिभौतिक ज्ञानाच्या ऊर्फ विज्ञानाच्या बळावर पाश्चात्त्य संस्कृतीने वैदिक संस्कृतीचा आत्मा जिंकला नसला तरी तिचा देह जो हिंदुस्थान तो जिंकला हें निर्विवाद होय! मग पाश्चात्त्य संस्कृति आसुरी म्हणा, किंवा सैतानी म्हणा, तिची पकड आम्हांला अजूनहि पूर्णपणें सोडवितां आलेली नाही हें प्रांजलपणानें कबूल करण्यास हरकत कोणती?

## दोन आत्यंतिक टोकें सारखींच त्याज्य!

आमच्या मूळ वैदिक धर्मांत न कल्पिलेले अनेक पंथ, भेद व रूढी स्मृतींच्या व पुराणांच्या काळांत उदयास आल्या आणि याचा परिणाम असा झाला की, त्यांची भीषण प्रतिक्रिया हिंदु संस्कृतीस आणि तिचा पोकळ अभिमान बाळगणाऱ्या हतबल हिंदु समाजास आज सर्वत्र सोसावा लागत आहे. अतिशय वाईटपणा तसाच अतिशय चांगुलपणा व सोशिकपणाहि सारखाच वाईट व त्याज्य होय. म्हणून हीं दोन विरुद्ध टोकें वगळून जर संस्कृति मध्यभागीं राहील तर तिचें संवर्धन व पोषण सुलभ व प्रभावी होईल. वाटल्यास, संस्कृतीच्या व साहित्याच्या प्रसारकांनी घड्याळाच्या लंबकाप्रमाणे दोनहि बाजूंकडे आंदोलनें घेऊन सभोंवारच्या परिस्थितीचा कानोसा अवश्य घ्यावा. पण खुद्द आपण स्थिर राहण्याचें असल्यास परिस्थितींतील सुवर्णमध्य गांठून तेथे दृढ आसन मांडल्याशिवाय त्यांना गत्यंतर नाही. केवळ ज्ञानावरच सारी भिस्त ठेवून विज्ञानशाखेची आम्हीं मनस्वी हयगय केली म्हणून आमच्या संस्कृतीच्या तेजावर मालिन्याचें धुकें घनदाट पसरलेलें आहे!

## प्रवृत्ति व निवृत्ति

महाराष्ट्र-साहित्यांतील स्थित्यंतरांकडे स्थूल मानाने दृष्टि दिल्यास असें दिसून येतें की, प्रत्यक्ष प्रवृत्तीचा जळजळीत उपदेश करीत आलेल्या संतांत रामदास स्वामी अग्रगण्य होत. त्यांनी शिवाजी महाराजांस अत्यंत उज्ज्वल उपदेश केला. आणि त्यांच्याकरवीं विशेषतः महाराष्ट्र-धर्माची तेजस्वी परंपरा त्यांनी राखली व टिकविली. पुढे या तत्त्वाचा लोप होत गेल्यामुळे ही संस्कृति क्षीण व निस्तेज होत गेली. आणि अखेर पेशवाईच्या काळांत पाश्चात्त्य संस्कृतीने तिचा पुरा पराजय केला. कर्मयोग व कर्मसंन्यास ऊर्फ प्रवृत्ति व निवृत्ति या दोन मार्गोपैकी प्रवृत्तिमार्गच संस्कृतीच्या वाढीला तरी पोषक होतो. प्रवृत्ति व निवृत्ति किंवा चैतन्य व संन्यास हीं दोन विरुद्ध टोकें होत. निवृत्तिही क्वचित् व्यक्तिमात्राला कल्याणकारी असेल, पण बहुजनसमाजांत संस्कृतीचा व साहित्याचा जोराचा प्रसार व्हावयाचा असेल, तर प्रवृत्तीचा म्हणजे चेतनेचा मार्गच उपयोगी पडेल. कारण, गति असल्याविना संस्कृतीचें चाक चालणार कसें आणि तिचा प्रसार होणार कसा ? या प्रवृत्तीला श्रद्धेची जरूरी असली तरी ती अंधश्रद्धा नसावी. अशा अंधश्रद्धेच्या आहारीं गेल्यामुळेच हिंदु संस्कृतीस प्रथम मुसलमानी व नंतर पाश्चात्त्य संस्कृतींचे आघातांवर आघात बसले असून तेणेंकरून ती अत्यंत हतबल झालेली दिसतच आहे. सारांश, या युगांत कोणत्याहि संस्कृतीला जगायचें असेल, तर तिनें सदा जागरूक राहून आततायी जनांचा प्रतिकार करण्याकरिता दंडनीतीचा अवश्य आश्रय केला पाहिजे हें उघड आहे.

## संस्कृतींत इतर मतांचा समावेश

मूळ वैदिक संस्कृति एखाद्या विशाल वटवृक्षाचा मधला बुंधा असें कल्पिल्यास, वेळोवेळीं इतर मतप्रवाहांच्या शाखा त्याजपासून फुटून ज्या उपसंस्कृती वेळोवेळीं हिंदुस्थानांत उदयास आल्या त्या मूळ बुंध्याच्या जीवनरसाला पूरकच होत गेल्या. वास्तविक सनातन वैदिक धर्म जातिनिरपेक्ष आहे. त्यांतील नीतितत्त्वें शाश्वत म्हणजे सर्व देशांना सर्व कालीं उपयोगीं पडण्यासारखीं आहेत. बौद्ध, जैन, स्मार्त, वैष्णव, द्वैत, अद्वैत इत्यादि विविध मतें तत्त्वाच्या बाबतींत नसलीं तरी तपशिलाच्या बाबतींत निराळीं होत. परंतु मूळ वैदिक संस्कृतींतील आद्य गुण जी दुसऱ्यांच्या विचारस्वातंत्र्याविषयी सोशिकपणा, तोच या विविध मतांचे अनुयायी उत्तरोत्तर विसरूं लागले. आणि अनेक पंथ व उपपंथ निर्माण करून व तत्त्वाची कास सोडून केवळ तपशिलाकरिता ते क्षुद्र बुद्धीने जोराने भांडूं लागले. तेव्हा वैदिक संस्कृतीच्या प्रसारास आळा बसला. बंगाल्यांत केशवचंद्र सेनांचा ब्राह्मो समाज, रामकृष्ण–विवेकानंदांचे फिरत्या प्रचारकांचे पंथ, पंजाबांतील आर्यसमाज असे विविध पंथ या शोचनीय परिस्थितीस तोंड देण्याकरिता उदयास आले. त्यांस पुष्कळ बंडखोर पण बुद्धिमान, कर्तबगार व प्रामाणिक अनुयायी मिळून त्यांनी आपआपल्या पंथांचा जोराने प्रसार करून जनतेच्या विचारांत व आचारांत मोठी क्रांति घडवून आणली. कालांतराने सनातन हिंदु धर्माची व्याप्ति पंथनिष्ठ व संकुचित मनोवृत्तीच्या जनांकडून आवळून काढण्यांत आली होती ती या नवमतांच्या अनुयायांनी पुनः विस्तृत केली. आणि याचा इष्ट परिणाम असा झाला की, पिछेहाटीपासून संस्कृतीचें व साहि-

त्याचें पाऊल प्रवृत्तीच्या व प्रगतीच्या मार्गांनी पुढे पडूं लागलें आणि येथीलच काय, पण इतर देशांतीलहि विचारवंत नेत्यांचीं मनें आकर्षून घेऊं लागलें.

## प्रवृत्तिमार्ग व भक्तिमार्ग

जगांत ईश्वर किंवा त्याचा अंश आहे किंवा नाही ? त्याचें स्वरूप व इहलोकांतील संबंध यांचा उलगडा कोणाला कसा व्हावयाचा ? हें कळणें अर्थातच सर्वांनाच साध्य नाही. परंतु ईश्वर केव्हाहि एकच. तो जसा सर्वांना समान तसेच त्यालाहि सर्व समान ही दृढ श्रद्धा मनांत बाळगून त्याप्रमाणे त्याला किंवा त्याच्या स्वरूपाला व शक्तीला परम भक्तीने आळविणें हाच भक्तिमार्ग होय ! हाच मार्ग तुकाराम कबीरादिकांनी चोखाळला. कर्नाटकांत रामानुजाचार्यांनी याच पंथाचा सक्रिय पुरस्कार करून तो प्रथम तामिळ देशांत पसरविला. सर्वांनी मुक्त होऊन श्रद्धायुक्त अंतःकरणाने ईश्वरास शरण जावें हाच या मार्गाचा मूलमंत्र होय. आणि याचा चोहीं-कडे प्रसार करण्याचें पवित्र कार्य हरिदास व कथेकरी यांनी आस्थेने केलें. परंतु हा प्रश्न शिल्लक राहतोच की, निवळ ' अव्यभिचारिणी ' भक्ति बरी की, तर्कावर आधारलेली चिकित्साबुद्धि बरी ? चिकित्सासंपन्न नसलेल्या भाविक जनांकरिता हा भक्तिमार्ग सांगितला आहे खरा. परंतु अंध भक्तिमार्गाने समाजाच्या थरांत ईश्वरविषयक श्रद्धा जितक्या त्वरेने उदित होते तितक्याच त्वरेने ती ओसरूं लागते असा इतिहासांत अनुभव आढळतो. ढोंगी व मायावी " साधुसंतां-कडून " अशा भाविक भक्तिमार्गांचा कसा व किती दुरुपयोग केला जातो व किती बाया व प्रसंगीं सुशिक्षित पुरुषसुद्धा या अंधश्रद्धेच्या मोहामुळे कसे चकतात व फसतात हें व्यवहारांत पदोपदीं आढळतें. म्हणून हा मार्ग सर्वांसच उपयोगी पडेल असें म्हणतां येणार नाही ! मात्र मोक्षास जाऊं इच्छिणाऱ्या एखाद्या अपवादादाखल व्यक्तीपुरता तो लागू पडेल. म्हणून तो फार काळपावेतों प्रभावी होऊं शकत नाही ! आजच्या कमालीच्या धकाधकीच्या परिस्थितींत चिकित्सक व प्रतिक्रियेच्या प्रवृत्तिमार्गाची अतिशय जरूरी आहे. म्हणून आमच्या संस्कृतींत व साहित्यांत आवश्यक स्थित्यंतरें व्हावयाचीं असतील तर आम्ही चिकित्सायुक्त प्रवृत्तीकडे उत्तरोत्तर अधिक लक्ष्य पुरविलें पाहिजे. अहिंसेचा किंवा कोणत्याहि तत्त्वाचा अतिरेक सर्वत्रीं त्याज्य मानिला पाहिजे. सनातन वैदिक धर्माचीं मूलतत्त्वें बदलत नाहीत. परंतु त्यांतील रूढी व आचारविचार मूलतत्त्वांच्या कलाने परिस्थितीप्रमाणे बदल पावूं शकतात. हें तत्त्व निर्वि-कार मनाने वेळींच ओळखून प्राप्त काळास धैर्याने तोंड दिलें पाहिजे. जर तसें करण्यास आम्ही वेळींच चुकूं तर इतर जगप्रसिद्ध संस्कृतीप्रमाणेच आमची संस्कृति व आमचें साहित्य कालां-तराने अस्त पावेल असें वाटतें.

कारवार, १६-७-३३　　　　मारुति अनंत पै

---



अनुक्रमणिका

# साहित्यपत्रिकेचें स्वरूप

महाराष्ट्र-साहित्य-परिषदेच्या त्रैमासिक पत्रिकेच्या संपादकाचें काम आमची सम्मति गृहीत समजून कांही एका संकेतानुसार थोड्या मुदतीपुरतें आमच्याकडे सोंपविलें. आता ही मुदत नेहमीच्या क्रमानुसार वाढली आहे. तेव्हा या संधीचा उपयोग करून या पत्रिकेचें स्वरूप मुख्यतः काय असावें असें आम्हांस वाटतें तें येथे अंमळ विस्ताराने सांगण्याचें योजिलें आहे. युक्तायुक्त पाहून परिषदेचे अभिमानी वाचक आपले यासंबंधी सूचक अभिप्राय प्रकट करतील तर आम्हांस व कार्यकारी मंडळास त्याचा विशेष उपयोग होणार आहे. परिषदेचें नियत उत्पन्न तसें म्हटलें तर नुसती पत्रिका चालविण्यासहि पुरेसें नाही. अशा स्थितींत आर्थिक बाजूनेहि वरील प्रश्न मर्यादित होतो, हें लक्षांत ठेवणें आवश्यक आहे.

परिषदेचें मुख्य कार्य काय हें ठरलें म्हणजे आपोआपच वरील प्रश्नाचा निकाल निश्चित लागतो असें आम्हांस वाटतें. परिषदेचे उद्देश संकल्पितांना जरी तिने पुष्कळ विस्तृत असें एक क्षेत्र आपल्याकरिता आखून घेतलें आहे, तथापि प्रत्यक्ष कार्याची मर्यादा तितकीच व्यापक आज व्यवहारांत उतरूं शकत नाही. आज स्थिति काय आहे तर ( १ ) मराठी भाषेला सरकारी आसरा नाही; ( २ ) अर्थात् राजव्यवहारामध्ये तिला प्रवेश नाही म्हटलें तरी चालेल. ( ३ ) विद्यापीठांतहि तिच्या अवहेलनेची तीव्रता कमी होत असली तरी तिचे न्याय्य स्थान तिला मिळालेलें नाही. पण मिळण्याचे दिवस पुष्कळच सन्निध आले आहेत असें म्हणण्यास चिंता नाही. निरनिराळे प्रकाशक, लेखक व संस्था मराठी भाषेच्या उन्नत्यर्थ स्वार्थ-त्यागाने किंवा व्यवसायदृष्टीने कामें करीत आहेत. अशा वेळीं मराठी भाषेला लोकव्यवहारांत व राजदरबारांत तिचें न्याय्य स्थान मिळवून देणें आणि या कामीं अवश्य ती संघटना करणें हें आमच्या मतें परिषदेचें आजचें मुख्य काम होय; साहित्यिक बंधुभाव ही एक मोठी शक्ति आहे. आणि सांप्रत विभंगलेल्या महाराष्ट्रास या शक्तीची अत्यंत आवश्यकता आहे. त्यामुळे ही शक्ति प्रभावी करण्याकडेच साहित्यपरिषदेने आपलें लक्ष एकवटलें पाहिजे. तसेंच कानडी गुजराथी बंगाली तामीळ प्रभृति समानशील भाषांशीं व भाषिकांशीं म. सा. परिषदेने सहकार्य करून सर्व हिंदुस्थानभर प्रांतिक व्यवहारांत देशी भाषांचें युग जारी करण्याचा प्रचंड खटाटोप आरंभून सिद्धीस नेला पाहिजे. आणि असें करतांना भिन्न भिन्न प्रांतांत भाषा-भेदामुळे परस्परांविषयी अज्ञान आणि अस्नेहबुद्धि उत्पन्न होणार नाही अशीहि काळजी वाहिली पाहिजे. स्वतंत्र ग्रंथनिर्मिति आज परिषदेने हातीं घेण्याची आवश्यकता नाही. इतिहास, कोश, काव्य, कथा इत्यादि अनेक प्रांतांत महाराष्ट्रांत अनेक प्रकारचे प्रशंसनीय उद्योग स्वतंत्रपणेंच चालू आहेत. तेव्हा परिषदेच्या शिरावरील तो बोजा अर्थातच कमी झाला आहे. तसेंच ' विविधज्ञानविस्तार, ' ' रत्नाकर, ' ' प्रतिभा, ' ' वागीश्वरी ' वगैरे अनेक मासिकें, द्वैमासिकें, त्रैमासिकें, पाक्षिकें वगैरे उत्तम प्रकारें चालली आहेत. आणि यद्यपि ' लोकशिक्षण '



अनुक्रमणिका

'विद्यासेवक' प्रभृति कित्येक उत्तम काम करणारीं मासिकें सांप्रत निघत नाहीत हें खरें; तथापि 'विहंगम,' 'विश्ववाणी' इत्यादि नवीन मासिकेंहि उत्साहानें पुढें येत आहेत. 'चित्रमय जगत्' 'किर्लोस्कर' सारख्या मासिकांतून वाङ्मयचर्चा जरी विशेषशी होत नाहीं तरीहि यांचा प्रसार मोठा असून विविध प्रकारची स्फूर्तिदायक कामगिरी त्यांच्याकडून होत आहे. अद्यापिहि मार्मिक, लोककथात्मक, पांडित्यचर्चात्मक अशा अंगांनीं सजविलेलें एखादें भारदस्त प्रौढ मासिक किंवा त्रैमासिक निघालें तर हवें आहे. तसेंच वरीलपैकीं कोणतेंहि नियतकालिक विषयाच्या दृष्टीनें उत्तम असलें तथापि आर्थिकदृष्टीनें यशस्वी झालें असें म्हणतां येत नाहीं. लेखक व संपादक यांना वरील नियतकालिकांतील भारदस्त अशा लेखनापासून द्रव्यदृष्टया कांहींच प्राप्ति होत नाहीं आणि प्रकाशकांनाहि थोडा तोटाच सोसावा लागतो. 'विविधज्ञानविस्तार' हें एवढें एकच मासिक असें दाखवितां येईल कीं, जें भारदस्त विषयाला वाहिलेलें असून पन्नाशी उलटून गेलेली पाहण्याचें अपूर्व भाग्य त्याला लाभलेलें आहे. तेव्हां परिषदेसारख्या सुप्रतिष्ठित संस्थेनें एक साहित्य-पत्रिका उत्तम प्रकारें चालवून अशीच दीर्घायुषी परंपरा निर्माण करावी असें वाटणें साहजिक आहे.

परंतु परिषदेचा एकंदर इतिहास व आजची आर्थिक स्थिति हीं विचारांत घेतलीं असतां उच्च साहित्यसेवेला वाहिलेली अशी पत्रिका चालविणें तीस शक्य नाहीं. वैयक्तिक प्रयत्नांची गोष्ट वेगळी. व्यक्तीनें केलेल्या उद्योगाला हौशीचें स्वरूप असून त्याची सर्व जिम्मेदारी कांहीं व्यक्तींवरच असते. आपलें असें विशेष कांहीं धोरण, आपलीं अशीं विशेष कांहीं मतें, यांच्या लोभानें व्यक्ति धाडस करूं शकतात. वाचकांच्या अभिरुचीचा विचार त्या घेतात किंवा घेत नाहीत. व्यक्ति स्वतंत्र असतात, घटनेनें नियमबद्ध नसतात. आर्थिकदृष्टयाहि तरण्यास व बुडण्यास त्या आपल्या हौशीनें वा धाडसानें तयार होतात. मागें ज्यांचा उल्लेख केला तीं सर्व नियतकालिकें व्यक्तितंत्र आहेत म्हटलें तरी चालेल.

आपली म. सा. परिषद् ही घटनाबद्ध आहे. नियमांची कडसणी घालूनच तिच्या अधिकाऱ्यास चालावयास पाहिजे. परिषदेच्या सभासदांतील बहुपक्षाप्रमाणें तिचा कारभार चालवावा लागतो. कारभार एकमतानें चालत असलेला दिसला आणि बहुपक्ष, लघुपक्ष, उपपक्ष वगैरे प्रकारचे पक्षाविष्कार आपणांस तेथें कोठें प्रगटपणें दिसले नाहीत, तरी ह्या सर्व गोष्टी अमूर्तावस्थेंत सर्व घटनाबद्ध संस्थांत असणें अपरिहार्य आहे. आणि याची जाणीव ठेवूनच अशा संस्थांच्या अधिकाऱ्यांनीं वागावें लागतें. व्यक्तितंत्र कार्याला जें स्वातंत्र्य सहज लाभतें तें संस्थांतंत्र कार्याला लाभूं शकत नाहीं.

परिषद् ही कांहीं एका व्यक्तीची नाहीं. परंतु संपादक हा मात्र एक व्यक्ति आहे. अर्थात् त्या व्यक्तीचे गुणदोष, बुद्धिदोष आणि शक्तिदोष यांचें प्रतिबिंब त्यांच्या संपादकीय कामांत दिसून आल्याखेरीज राहणार नाहीं. थोडक्यांत स्पष्टपणें लिहावयाचें तर संपादक या व्यक्तीचें परंतु परिषदेच्या खर्चानें चाललेलें असें या प्रकाशनाचें स्वरूप राहणार हें उघड आहे. संपादकाच्या मतांचा पिंड जसा बनला असेल तशीच रचना पत्रिकेंतहि होणें बव्हंशीं

अपरिहार्य आहे. गेलीं ६ वर्षे पत्रिकेचे माजी संपादक ह्यांनी पत्रिकेला जें एक स्वतंत्र वळण लाविलें त्यावरूनहि ही गोष्ट सहज सिद्ध होईल.

आमच्या मतें परिषदेच्या पत्रिकेचें स्वरूप एखाद्या स्वतंत्र साहित्यविषयास वाहिलेल्या नियतकालिकाप्रमाणे नसावें. म्हणजे ती काव्यशास्त्रविनोदपत्रिका न व्हावी. साहित्य-विषयक लेख आणि चर्चा चार ठिकाणीं चालते, तींत आणखी एका ठिकाणीं तशी भर घालावी हा परिषदेच्या पत्रिकेचा हेतु नसावा. तर व्यक्तितंत्र प्रयत्नांना जें साध्य होत नाहीं, परंतु ज्याची अत्यंत आवश्यकता आहे असें काम परिषदेच्या पत्रिकेनें करावें. या संघटनात्मक कार्यावर परिषदेने जोर द्यावा म्हणून वर सुचविलें तिकडे लक्ष ठेवून पत्रिकेची मांडणी आमच्या मतें कशी असावी तें आता तपशीलवार सांगूं.

पहिली गोष्ट मराठी भाषेत प्रसिद्ध होणाऱ्या यच्चयावत् सर्व पुस्तकांची नांवनिशीवार व शक्य तर वर्गीकृत यादी पत्रिकेंत प्रसिद्ध व्हावी. मुंबई सरकार अशी एक त्रैमासिक यादी प्रसिद्ध करीत असतें. परंतु एक तर ती लोकांस माहीत नाही, दुसरें ती इंग्रजींत असते. आणि तिसरें म्हणजे सांप्रत तिला आकार फारच जबर पडतो; आणि ती निराळी मिळण्यास त्रास पडतो. इतकें असूनहि अभिप्रायदर्शन त्यांत प्रायः नसतेंच. यामुळे ती यादी मराठी वाचकां-साठी आवश्यक ते संस्कार करून स्वतंत्रपणें प्रसिद्ध व्हावयास पाहिजे. ही त्रैमासिक यादी मुंबई इलाख्याची असल्यामुळे या इलाख्यांतील १० मराठी जिल्ह्यांचाच हिशोब या यादींत येतो. वऱ्हाड–नागपूरकडील ग्रंथांचा उल्लेख या यादींत येत नाही. वऱ्हाड–नागपूर खेरीज निजामी मराठवाडा, बडोदें, ग्वाल्हेर, इन्दूर, तंजावर इत्यादि ठिकाणीं जे महाराष्ट्रीय ग्रंथ प्रसिद्ध होतात त्यांची नोंद वरील मुंबई सरकारच्या पत्रिकेंत अर्थातच होत नाही. यास्तव परिषदेने अशा प्रकारची विश्वसनीय, अभिप्रायासह यादी प्रसिद्ध करण्याचें काम प्रथम हातीं घ्यावें असें आमचें मत आहे. पुण्याच्या साहित्य–संमेलनांत या विषयाकडे बरेंच लक्ष पुरवून योग्य असे ठराव करण्यांत आले होते. परंतु पुढील सम्मेलनांतून या उपयुक्त ठरावांकडे कोणी लक्ष दिलें नाही आणि परिषदेनेहि यासंबंधी कांही केलें नाही. हें काम एकप्रकारें कारकुनी स्वरूपाचें आहे आणि म्हणूनच आवश्यक असूनहि कोणी विद्वान तें हातीं घेत नाही. वाङ्मयाच्या इति-हास–लेखकाला ही नड तीव्रतेने भासणें साहजिक आहे. परंतु हें काम एका व्यक्तीस करणें बरेंच अडचणीचें आहे. निरनिराळ्या संलग्न संस्था, ठिकठिकाणचीं मराठी ग्रंथालयें इत्यादीं-कडून या कामीं वार्षिक द्रव्यदानहि होऊं शकेल. सरकारी यादींत शालोपयोगी पुनर्मुद्रित वगैरे ग्रंथ असतात. यामुळे साहित्य प्रगतीच्या दृष्टीने त्यांचें पुनर्वर्गीकरण करावयास पाहिजे आणि हें काम परिषदेनेच करणें योग्य होईल. मध्यवर्ती प्रातिनिधिक सभेलाच हें सुसाध्य आहे.

या यादीच्या प्रसिद्धीबरोबरच तिचा परामर्षहि परिषदेनेच घेणें प्राप्त आहे. सम्मे-लनाच्या अध्यक्षांकडून हा परामर्ष लिहवून घेणेंहि शक्य आहे; परंतु तो त्यांच्या भाषणाचा मुख्य विषयच असण्याची तादृश आवश्यकता नाही. एवंच प्रकाशित ग्रंथांची एक विस्तृत अनुक्रमणी व तिला जोडून एक परिचयपरामर्षात्मक प्रबंध हीं परिषदेनेच नियमाने प्रसिद्ध केलीं

पाहिजेत. यासाठी लागणारें सर्व साहित्य परिषदेने जुळविलें पाहिजे व अवश्य तो खर्चहि करण्यास सिद्ध असलें पाहिजे.

परिषदेचें दुसरें काम म्हणजे महाराष्ट्रांत सर्वत्र महाराष्ट्रभाषेच्या व्यवहारास जर कोठे अडथळे येत असतील तर त्यांची विश्वसनीय माहिती मिळवून ते दूर करण्यासाठी झटणें. उदाहरणार्थ, गोमन्तक, निजामी मराठवाडा वगैरे स्थळीं मराठी प्रजेची मातृभाषाव्यवहारासंबंधी काय अडचण आहे त्यावर सतत लक्ष पुरविलें पाहिजे. कायद्याचे प्रतिबंध असतील तर ते दूर करवून घेतले पाहिजेत. मराठी साहित्याला त्या त्या सरकारांकडून योग्य उत्तेजन मिळत नसेल तर तें मिळविलें पाहिजे. सभा भरविल्या पाहिजेत; अर्ज, शिष्टमंडळें पाठविलीं पाहिजेत. नसतील तेथे लोकांस संस्थाबद्ध म्हणजे संघटित होण्यास प्रवृत्त केलें पाहिजे. या सर्व खटपटी परिषदेने उत्तेजित केल्या पाहिजेत किंवा तिच्या द्वारेंच नियमित झाल्या पाहिजेत. परिषदेची पत्रिका ही या कामाच्या प्रसिद्धीसाठी उपयोजिली पाहिजे.

मराठींतून शिक्षण मिळण्यासाठी काय सोई गैरसोई आहेत त्याबाबतहि विद्यापीठें व सरकारें यांजकडे राबता ठेवून सतत जागरूक राहून इष्ट ती सुधारणा घडून येईतों झटलें पाहिजे.

जागजागचीं वाङ्मयमंडळें ममतेंत घेतलीं पाहिजेत. परिषद् म्हणजे अशा छोट्या स्थानिक मंडळांच्या प्रतिनिधींचा बलवान संघच बनविला पाहिजे. स्थानिक संस्थांच्या दप्तरीं मराठीचा शिरकाव अद्यापिहि म्हणावा तसा झालेला नाही. तो अधिकाधिक घडवून आणावा. आगगाडीखातें, तारखातें, न्यायखातें इत्यादि खात्यांतून इंग्रजीचा अनवश्यक अंमल कमी करून मराठी अधिकाधिक क्षेत्र कसें व्यापील तें पाहिलें पाहिजे.

निरनिराळ्या शास्त्रांतील परिभाषा निश्चित करण्याचें काम परिषदेने हातीं घेऊन त्यासंबंधी चर्चा पत्रिकेने दिली पाहिजे. अनेक इंग्रजी शब्दांस काय मराठी प्रतिशब्द योजावे हें पुष्कळांस ठाऊक नसतें आणि ती फारच मोठी नड व्यवहारांत आहे. तेव्हा या संबंधाने पत्रिकेंत स्वतंत्र सदरच उघडलें पाहिजे. तें सदर अतिशय उपयुक्त ठरेल व त्यामुळे मराठींतून व्यवहार करण्याचें धैर्य अनेकांचे ठायीं उत्पन्न होईल.

खाजगी दुकानें, संस्था, इत्यादींच्या व्यवहारांतहि मराठीचा बेसुमार संकोच झालेला दिसतो. कै. राजवाडे यांनी शारदोपासक संमेलनाच्या पुणें येथील आपल्या अध्यक्षीय भाषणांत ही दुरवस्था निर्भीडपणें दाखवून दिली होती. परंतु आमच्या लोकांचे डोळे अजून उघडत नाहीत. मराठीमाणूस मराठीमाणसास इंग्रजी पावती देतो, लग्नचिठ्ठी इंग्रजींत पाठवितो— ही नामुष्कीची गोष्ट नव्हे काय ? ही कोण घालविणार ? परिषदेने हाहि प्रयत्न केला पाहिजे.

भोवतालच्या प्रांतिक भाषांचा संसार कसा काय चालला आहे, तसेंच जगांतील एकंदर प्रमुख भाषांचे संसार कसे चालले आहेत इत्यादीविषयीं साधार व सप्रमाण माहिती परिषदेजवळ पाहिजे व तींतून सर्वांस उपयुक्त असलेला अंश पत्रिकेच्या द्वारा प्रकट केला पाहिजे.

विख्यात साहित्यिकांचीं जीवनचरित्रें पत्रिकेंत आलीं पाहिजेत आणि यच्चयावत् सर्व लेखकांची व साहित्यभक्तांचीं नोंद व त्यांच्या जीवनचरित्राचा निदान आराखडा तरी साहित्यपरिषदेजवळ उपलब्ध झाला पाहिजे ह्या हेतूने परिषदेने परिचयपत्रिका छापून घेतलेल्या आहेत

त्या लेखकांनी भरून देऊन परिषदेस साहाय्य केलें पाहिजे. म्हणजे हें काम उरकणें सोपें जाईल.

तात्पर्य, मराठी साहित्याच्या प्रसाराला होत असलेले अडथळे संघटित प्रयत्नाने दूर करण्याचें काम परिषदेने अंगिकारलें पाहिजे. तसेंच वाङ्मयाचा एक प्रातिवार्षिक आढावा व त्याविषयीचे आंकडे वगैरे सर्व साधनें हीं परिषदेजवळ नेहमी उपलब्ध झालीं पाहिजेत. ठिकठिकाणीं मराठीग्रंथालयें व साहित्यसंस्था यांच्या स्थापनेस परिषदेने साहाय्य केलें पाहिजे आणि जुन्या नव्या साहित्यसंस्थांचा सहकार संपादन प्रातिनिधिक पद्धतीने घडवून आणण्याचीं कार्यें साधिलीं पाहिजेत. या कामासाठी जसें परिषदेचें एक मंदिर असणें अवश्य आहे आणि जसें कार्यकारी मंडळ असणें अवश्य आहे तसेंच या विविध कार्यास वाहिलेलें एक मुखपत्रहि आवश्यक आहे. आणि म. सा. पत्रिका हीच सांप्रत तें मुखपत्र होय. आणि याच धोरणाने पत्रिका चालवावी असें आम्हांस वाटतें. यामुळे पत्रिकेस एखाद्या गॅझेटसारखें स्वरूप येईल असा कोणी आक्षेप घेईल; परंतु मराठी साहित्याचा अवघा संसार सुखाचा कसा करावा आणि सर्व महाराष्ट्र–लोक आनंदाने कसा भरावा हें पाहण्याचें काम हेंच जर साहित्य–परिषदेचें कर्तव्य असेल, तर गॅझेट–स्वरूपाच्या एखाद्या पत्रिकेची परिषदेस आवश्यकता किती आहे हें सांगण्याची गरज नाही. प्रमाणभूत अशी आंकडेवार माहिती जमा करून ती वर्गीकृत करून साधार प्रसिद्ध करणें हें पत्रिकेचें मुख्य धोरण ठरविल्यावर पत्रिकेचीं पानें त्या बेताने निश्चित करण्यांत यावींत आणि अन्यत्र प्रसिद्ध होण्याजोगा मजकूर पत्रिकेंतून कमी करून त्या बचतींतून माहिती जमविण्याच्या कामासाठी लागणारा पैसा निराळा काढावा. इतर साहित्यविषयक नियतकालिकांना या धोरणामुळे पत्रिकेची स्पर्धा बाधणार नाही. आणि मोघम आणि व माहितीच्या आधाराने बोलण्याचालण्यापेक्षा पक्क्या आणि पद्धतशीर रीतीने जमविलेल्या माहितीच्या आधारें आपणास चालतां येईल. सुंदर चित्रांपेक्षा नानाविध आलेखांनी पत्रिकेची उपयुक्तता वाढवितां येईल. पत्रिकेने असें काम केल्यास सर्वांसच ती आकर्षक व मोहक न वाटली तरी अतिशय उपयुक्त आणि संग्राह्य वाटेल यांत आम्हांस तरी संदेह वाटत नाही.

दत्तो वामन पोतदार, संपादक

# कोचीन-त्रावणकोरांतील कोंकणी

सोळाव्या शतकांत गोमांतकांत पोर्तुगीज सरकारने एतद्देशियांवर जेव्हा धर्मांतराचा करडा जुलूम चालविला तेव्हा कांही लोक मलबारांत व आणखी खाली जाऊन स्थायिक झाले. कोचीन आणि त्रावणकोर संस्थानांतून स्वधर्मीय राजांच्या छत्राखाली त्यांना चांगलें सुखाने राहतां आलें. तिकडे त्यांनी व्यापारी पेषा पत्करला व आपलें स्वतंत्र अस्तित्व राखिलें.

या कोंकणी लोकांत ब्राह्मण आणि शूद्र अशा दोनच जाती आहेत. गोव्यांतील आपल्या सारस्वतबंधूंप्रमाणे हे बहुधा स्मार्त राहिले नसून माध्व बनले आहेत. ब्राह्मण बहुतेक ऋग्वेदी देशस्थ आहेत. तिकडे यांना दक्षिणेंतील इतर ब्राह्मणांच्या दर्जाचे लेखीत नाहीत. याला कारणें वरींच आहेत. मुख्यतः मराठी ब्राह्मण हा नेहमीच द्राविडी ब्राह्मणांकडून हीन मानला जातो; त्यांतून तो कोंकणी किंवा कोंकणस्थ व ऋग्वेदी असल्यास आणखी हीन ! तशांत हे कोंकणी ब्राह्मण व्यापार करणारे म्हणजे वैश्यवृत्ति चालविणारे, तेव्हा त्यांचा द्राविडी ब्राह्मणांत वरचा दर्जा कसा राहणार ? यांनी वैश्यवृत्ति पत्करण्याचें कारणहि कदाचित् यांना भिक्षुकवृत्ति प्रथम मिळाली नसावी हें असूं शकेल. तेव्हा या कोचीन-त्रावणकोरमधील कोंकणी ब्राह्मणांचीं देवस्थानें निराळींच स्थापलीं जावींत यांत आश्चर्य नाही. यांच्या देवळांना तिरुमल देवस्माम म्हणतात. त्यांना ज्याप्रमाणे मल्याळी हिंदू आपल्या देवळांच्या गाभाऱ्यांत येऊं देत नाहीत त्याचप्रमाणे हेहि कोंकणी ब्राह्मणांखेरीज इतरांना आपल्या देवाजवळ येऊं देत नाहीत. अपवाद म्हणून फक्त नंबुद्री ब्राह्मणांना तशी सवलत देण्यांत येते. यांचा देव म्हणजे तिरुपतीचा व्यंकटरमण होय. पण यांच्या देवळांतून व्यंकटरमणाची मूर्ति बसविलेली नसून चांदीच्या पत्र्यावर मूर्तीचा ठसा उठविलेला टांक ठेवलेला असतो. मंजेश्वर, मुल्की व कारकल या तीन ठिकाणचीं देवस्थानें प्रमुख गणलीं जातात. हीं देवस्थानें फार श्रीमंत असल्याची सर्वत्र ख्याती आहे; तीं जणु मोठीं संस्थानेंच आहेत. या देवळांतून देव अंगांत आणणारे 'दर्शन' ब्राह्मण असतात. हे दर्शने भक्तांच्या प्रश्नांचीं उत्तरें कोंकणींत देतात; कोंकणी न समजणाऱ्यांना तीं त्यांच्या भाषेत समजावून सांगितलीं जातात. कांही दर्शने खुणांनी उत्तरें देतात. यांना प्राप्ति चांगली होते. जातींतील सर्व तंटेबखेडे मंजेश्वर येथील काशीमठाच्या स्वामीकडे निवाड्याकरितां नेतात. स्वामींचा निकाल अखेरचा मानला जातो हें विशेष आहे. कोंकणी बायकांचा पेहराव इतर बायकांहून अगदी निराळा वाटतो. प्रभु, पै, शणै, किणी इत्यादि आडनांवें (ब्राह्मणांत) गोव्यांतील सारस्वतांचींच कायम राखिलीं आहेत. बरेच ब्राह्मण मोठे श्रीमंत व जमीनदार आहेत.

कोंकणी ब्राह्मणेतरांची जी जात आहे तिला कुडुमी किंवा **कुडुमिकर** असें नांव आहे. कुणबी याचा अपभ्रंश कुडुमी असावा. कोणी 'कुटुंबी' या शब्दाशीं त्याचा संबंध जोडतात; पण तो बरोबर वाटत नाही. यांचें लौकिक नांव 'इडिया' (कुटणारे) असें असून तें त्यांच्या पोहे कुटण्याच्या धंद्यावरून पडलें. त्रावणकोरांत चांगले पोहे प्रचारांत आणण्याचें श्रेय यांच्याकडे जातें. कुडुमींपैकीं बरेच जण आपणाला 'चेट्टी' ही व्यापारी पदवी लावून घेतात. मागे कोचीनच्या राजांनी कांही घराण्यांना 'मूप्पान' (वडील) अशी प्रसिद्ध पदवी दिलेली होती. प्रत्येक कुडुमीगांवीं एक मूप्पन असतो. त्याच्याकडे पंचायतीचें काम असतें. सर्व जातीचा श्रेष्ठ मूप्पन त्रिपाणीथोरेचा होय. कांही कुडुमी कुटुंबांचीं 'कामाटी' अशीं आडनांवें आहेत.

बहुधा कोंकणी ब्राह्मणांचे नोकर म्हणून कुडुमी राहतात. कांहीं थोडे मोठे व्यापारी व शेतकरी आहेत. पूर्वी ते मलबारी राजांजवळ शिपाईबाण्याने राहात. कोंकणी ब्राह्मणांप्रमाणे कुडुमी आपला स्मार्तधर्म सोडून मध्वानुयायी वैष्णव बनलेले दिसत नाहीत. यांच्यांत मद्दु किंवा मदन ही एक मुख्य गौण देवता आहे. यांचा वंश पितृसत्ताक पद्धतीने चालतो. मलबारांतल्याप्रमाणे मातृसत्ताक पद्धति यांच्यांत फारशी रुजली नाही. कुटुंबांतील फक्त वडील माणसांस मृत्यूनंतर जाळतात; बाकीच्यांस पुरतात. यांचें स्मशान अगदी वेगळें असतें. इतर कुळंब्यांत व यांच्यांत रोटीव्यवहार मुळीच होत नाही.

यांची भाषा कोंकणीच पण फार अपभ्रष्ट आहे. तथापि ती मराठीची एक बोली म्हणून समजली पाहिजे. कारण गोव्यांतील कोंकणी भाषेंत तुळु व मल्याळी शब्दप्रयोग शिरून ही मलबारी कोंकणी बनली आहे. दक्षिण कानडा जिल्ह्यांत या कोंकण्यांच्या भाषेवर कानडीचाच विशेष परिणाम झालेला असणार हें उघड आहे. मलबार त्रावणकोरांतील रोमन कॅथॉलिक खिस्त्यांची भाषाहि अशीच कोंकणी आहे. यावरून गोमांतकी भाषेचा प्रसार खाली त्रावणकोरपर्यंत कसा पोंचला हें आपणाला नव्याने कळून येतें. या कोंकणीभाषक लोकांची संख्या सुमारे ४० हजार असावी. या कोंकणी भाषेचा नमुना देतां आल्यास देण्याचा विचार आहे. तिकडील कोणी व्यासंगी गृहस्थांनी हिचें व्याकरण, लकबा, वाक्प्रचार इत्यादि पाठविल्यास मराठी भाषाभ्यासास फार मदत होईल. कोचीन येथील महाराष्ट्रमंडळाने हें काम हातीं घ्यावें अशी आमची आग्रहाची विनंती आहे.

**चिंतामण गणेश कर्वे**

---

# अभिप्राय

## न्यायमूर्ति पंडित केशवरावसाहेब यांचें चरित्र

कै. नामदार केशवराव यांचे हें ७५ पृष्ठाचें अल्प चरित्र त्यांचेच परम स्नेही व सार्वजनिक कार्यांतील सहकारी किंवहुना पट्टशिष्य श्री. काशिनाथराव वैद्य यांच्या हातचें आहे हें सांगितल्यानंतर याच्या चांगुलपणाची दुसरी शिफारसच नको. राव-साहेब स्वतःच्या बुद्धिप्रभावाने आणि कर्तबगारीने गरिबीतून आणि अज्ञानावस्थेंतून वर येऊन निजामशाहींतील महाराष्ट्रीयांचे 'रावसाहेब' (न्या. मू. रानडे) कसे बनले याचें वर्णन चरित्रकाराने जें केलें आहे तें फार हृदयंगम वठलें आहे यांत शंका नाही. त्यांतून स्वतः पाहिलेल्या, अनुभवलेल्या व ऐकलेल्या खऱ्या गोष्टींची यांत भर पडली असल्याने महीपतीच्या एखाद्या संतचरित्राप्रमाणे हें रसाळ व बोधप्रद झालें आहे. रावसाहेबांची सागराप्रमाणे शांत मूर्ति, त्यांचा— पुष्कळदा कृत्रिम वाटणारा पण अंगींच पुरापूर जडलेला — दरबारी विनय, अति भिडस्त स्वभाव, शुद्धाचरण, ज्ञान-लालसा, परोपकारबुद्धि व उत्कट देशाभिमान हीं सर्व या चरित्राच्या वाचनामुळे पुन्हा डोळ्यांपुढे उभीं राहतात व अशा पुरुषाला मराठवाडा आंचवला याची आठवण होऊन अति खेद होतो. मोंगलाईत दुसरे 'रावसाहेब' कधी होतील तो सुदिन; आज तरी त्यांच्या तोडीचा कोणी दिसत नाही.

या चरित्राने रावसाहेबांच्या चाहत्यांची तहान मुळीच भागण्यासारखी नाही इतकें तें अल्प आहे. श्री. काशिनाथराव यांनीच त्यांचें विस्तृत चरित्र लिहिण्यास घ्यावें व असें कांही मोठें वाङ्मयस्मारक करावें— कारण आतापर्यंत कोणतेंच झालेलें ऐकिवांत नाही— अशी त्यांस प्रेमाची सूचना आहे.

**चिंतामण गणेश कर्वे**

\+ + + +

### प्रतिभा

हें पाक्षिक गेल्या जानेवारीपासून निघूं लागलें आहे. पाक्षिकाचें आजवर एका वर्षाचे म्हणजे २५ अंक निघाले आहेत. तेव्हा वर्षभराचें हें साहित्य पाहून त्याज-बद्दल निश्चित मत बनविण्यास आता हरकत नाही.

कांही अपवाद सोडल्यास पाक्षिकाचे बरेच अंक वरच्या दर्जाचे निघाले यांत शंका नाही. पाक्षिकांत अभिनवता विपुल प्रमाणांत दृष्टीस पडते. साहित्यिक क्षेत्रांत जे जिवंत स्वरूपाचे अनेक तात्विक किंवा व्यावहारिक स्वरूपाचे प्रश्न आहेत त्या-संबंधी यांत प्रसिद्ध होणारी साधकबाधक चर्चा बरीच उपयुक्त स्वरूपाची आहे. 'साहि-

लिकांच्या सान्निध्यांत' ही लेखमाला नवीन प्रकारचें लिखाण उत्पन्न करूं लागली आहे. या मालेंत बरेच लेख आले. त्यांतील सर्वच दर्जाच्या दृष्टीने चांगले नसले तरी कांही बऱ्या दर्जाचीं स्वभावचित्रें गणलीं जातील असें वाटतें. लेखकवर्ग बहुतेक नव्या व तरुण पिढींतील दिसतो. संपादकवर्ग बरेंच लेखन स्वतः करण्याचें धोरण ठेवीत असल्याचें दिसतें. हें धोरणहि अभिनंदनीय आहे. संपादकवर्गांतील मंडळींचें लेखन तुलनात्मक दृष्टीने परीक्षिल्यास त्यांतील वैचित्र्याची मोठी मौज दिसून येईल. खानोलकरांच्या लिहिण्यांत सोज्ज्वल भाषा व प्रचारकी उत्साह दिसतो, तर काळयांचें लेखन भाषेच्या दृष्टीने कचित् केतकरी वळणाचें असलें तरी केतकरांप्रमाणेच विचारप्रवर्तकहि असतें; आणि कुलकर्ण्यांचें लिखाण विद्वत्ताप्रचुर असून तें त्यांच्या अभ्यासी वृत्तीची साक्ष पटवितें. असो.

हें पाक्षिक 'मराठी भाषेचें एक नवीन लेणें' आहे असें त्याबद्दल उत्साहाचे उद्गार केसरीने त्यावर अभिप्राय देतांना काढले आहेत. या उद्गारांतील अधिऱ्या अतिशयोक्तीचा भाग सोडून दिल्यास त्यांत पाक्षिकाच्या मराठी भाषेच्या सेवेची जी स्तुति अभिप्रेत आहे ती आम्हांस सर्वस्वी मान्य आहे. पाक्षिक निघाल्यापासूनच लोकप्रिय झालें आहे आणि या लोकप्रियतेस तें पात्रच आहे यांत संशय नाही.

एकाददुसरी सूचना करितों त्याबद्दल पाक्षिककर्त्यांनी राग मानूं नये. प्रुफें वाचण्याकडे छापखान्यांत अधिक लक्ष्य दिलें जाईल अशी व्यवस्था करावी. लेखांच्या निवडींतहि अधिक काळजी घेणें जरूर आहे. अलीकडील एकदोन अंकांत पाक्षिकाच्या दर्जास किंचित् बाध आल्यासारखा भासला.

डिसेंबर १९३३ दे. द. वाडेकर

ता. क.— हा अभिप्राय लिहिल्यानंतर "प्रतिभे"च्या मुद्रणविषयक, प्रकाशनविषयक व संपादकीय व्यवस्थेंत बदल झाला आहे असें नवीन वर्षाच्या पहिल्या अंकावरून दिसतें. या नवीन व्यवस्थेखालीहि "प्रतिभे" ची भरभराटच होईल असा आम्हांस विश्वास वाटतो.

दे. द. वाडेकर

---

# नागपूर संमेलन

( लेखकः—संपादक )

ठरल्याप्रमाणे ता. २५–२६–२७ रोजीं नागपूर येथे महाराष्ट्र साहित्य संमेलन मोठ्या थाटाने आणि उत्साहाने भरलें. ता. २५ रोजीं अध्यक्ष, स्वागताध्यक्ष यांचीं भाषणें, ता. २५ व २६ रोजीं रात्रौ विषयमंडळाच्या सभा व काव्यगायन, ता. २६ व २७ रोजीं दुपारीं ठराव, ता. २६ रोजीं सकाळीं प्रदर्शनाचें उद्घाटण आणि ता. २७ रोजीं सकाळीं निबंधवाचन येणेंप्रमाणे कार्यक्रम झाला. स्वागत-सभासद सुमारें ६०० आणि प्रतिनिधि सुमारें ४०० हजर होते. यांखेरीज स्त्री व पुरुष प्रेक्षक म्हणून सुमारें २ ते ३ हजार समाज असावा. स्त्रियांची संख्या या संमेलनाला बरीच मोठी हजर होती. एकंदर मंडपांतच ४ हजारांहून अधिक माणसांचा समावेश होऊं शकत नसल्याने स्वागतसमितीने प्रेक्षकांच्या तिकिटांची विक्री बंद केल्याचें कळलें. नाहीतर याहींपेक्षा अधिक समाज बाहेर जमलेला होता, तो संमेलनाची मजा लुटण्यास आंत आला असता.

*　　　*　　　*

संमेलनासाठी योजलेली जागा—नील सिटी हायस्कूलचा विस्तीर्ण जुना वाडा आणि त्याच्या भोंवतालच्या विस्तीर्ण पटांगणांत घातलेला मंडप—ही पुरून उरेशी होती. प्रदर्शनाची सोय शेजारींच सिटी कॉलेजच्या बैठ्या इमारतींत केली होती. सिटीस्कूलचे सुपरिटेंडेंट श्री. तात्याजी वझलवार हे रात्रंदिवस स्थानपुरुषाप्रमाणे कोणासहि न दिसतां संमेलनावर, संमेलनाच्या व्यवस्थेवर सर्व प्रकारची देखरेख करीत होते आणि सिटी कॉलेजचे प्रिन्सिपॉल पांढरीपांडे हे प्रदर्शनाची सर्व जोखीम संभाळत होते. प्रतिनिधींना उतरण्याची सोय संमेलनापासून एक हाकेच्या अंतरावर असलेल्या दादीभाई देशमूख मुलींची शाळा आणि न्यू इंग्लिश स्कूल या दोन प्रशस्त इमारतींत करण्यांत आली होती. भोजनव्यवस्था जवळच जुन्या टिळक विद्यालयाच्या इमारतींत करण्यांत आली होती. प्रतिनिधींच्या आरामाची सोय स्वागतमंडळाने स्वयंसेवकांच्या साहाय्याने त्यांची तब्बेत खूष होईल अशी ठेवली होती. विशेष हा कीं, प्रतिनिधींकडून नागपूरकरांनी राहण्याभोजनाचा आकार घेतला नाही. खरा अतिथिधर्म हाच होय यांत शंका नाही. तथापि, राजाश्रय नसलेल्या ठिकाणीं हा आतिथ्यधर्म पाळणें जोखमीचें असते आणि जी मंडळी भोजनादिकांचा खर्च वाजवी म्हणून आनंदाने देण्यास तयार असते ती तितकाच पैसा साहित्यपरिषदेच्या कांही इतर मागण्या पुरविण्यासाठी संमेलनाच्याच प्रसंगीं आपल्या खर्चांत भर घालून देण्यास तयार नसते, हें लक्षांत आणून जर स्वागत समितीने भोजनखर्च घेऊन जमलेली

रक्कम साहित्यपरिषदेच्या कायमनिधीकडे देण्याचें योजलें असतें तर स्वागतसमितीला परिषदेस एक हजार रुपये देतां आले असते.

* * *

नागपूर शहरांतील धनतोली, बर्डी, महाल वगैरे भागांतील वस्ती मैला दोन मैलांच्या टप्प्यांनी विभागलेली असल्याने खाजगी रीतीने उतरलेले प्रतिनिधि, लॉबलॉबचे प्रेक्षक आणि निरनिराळ्या ठिकाणीं उतरलेले प्रतिनिधि यांना वारंवार येजा करण्याने बरीच गैरसोय होणें अपरिहार्य होतें, म्हणून असेल कदाचित् परंतु नागपूर-संमेलनांतील एकंदर कार्यक्रमाच्या वेळा सोयीच्या वाटल्या नाहीत. सकाळीं ७–७॥ ते ११ आणि दुपारीं ३॥ ते ८॥ आणि दुपारच्या कार्यक्रमाच्या प्रारंभीं व नंतर थोडाथोडा वेळ विषयमंडळाच्या सभा असा कार्यक्रम अधिक सोइस्कर झाला असता. असो. संमेलनाची व्यवस्था यापुढे नियमबद्ध व्हावी असें एकंदर लोकमत दिसून आलें असल्यामुळे त्याची चर्चा आम्ही अन्यत्र स्वतंत्रपणें करण्याचें योजिलें आहे.

* * *

निबंधवाचनाच्या वेळेस समाज, रोडावलेला तर त्याच्या उलट काव्यगायनाला तुफान गर्दी व गोंधळ हा नेहमीचा अनुभव नागपुरासहि आला. परंतु यास घटनेंतच कांही शिस्त लाविली असतां हे दोन्ही कार्यक्रम भरदार असे कसे करतां येतील, तें समजून येईल.

* * *

संमेलनाच्या जागेजवळच अलीकडे दोन चार पुस्तकविक्रयालयें व त्याला जोडून क्षुधाशांतिगृहें असल्याने शारीरिक व बौद्धिक दोन्ही प्रकारच्या क्षुत्पिपासांचें समाधान करून घेतां येत होतें.

* * *

परिचयाचा कार्यक्रम सर्वांस आवश्यक वाटतो. परंतु बहुतेक प्रसंगीं मंडळी जमली असतां कसा परिचय करून द्यावा, आपण बोलावें की दुसऱ्याने आपला परिचय करून द्यावा अशा वाटाघाटींतच आणि संकोचांतच बराच काळ निघून जातो. छापील परिचयपत्रिका भरून घेण्यासाठी साहित्यपरिषदेमार्फत यंदा मुद्दाम खटपट केली होती. परंतु तिकडे साहित्यभक्तांचें जावें तसें लक्ष गेलें नाही. संमेलनाचा एक नियमबद्ध कार्यक्रम तयार करणें आणि तो सर्वांनी अमलांत आणणें हाच या सर्व उणीवांवर खरा उपाय आहे.

* * *

यंदा म. सा. परिषदेच्या कार्यकारी मंडळाने आपली कचेरी संमेलनाच्यापूर्वी सुमारें १० दिवस नागपुरास उघडून परिषदेचे चिटणीस रा. राजाराम दामोदर देसाई यांस तेथें पाठवून जो अभिनंदनीय उपक्रम केला तो कसा आणि कितपत

यशस्वी झाला आणि आम्ही आमच्या मागील लेखांत म्हटल्याप्रमाणे संमेलन हें परिषदेचेंच एक काम आहे ही समजूत या योजनेमुळे दृढ होऊन परिषदेची ओळख नागपूरकरांस कशाप्रकारें झाली आणि संमेलन व परिषद् यांच्या दृढीकरणास याने किती साहाय्य झालें या सर्व गोष्टी चिटणिसांच्या एतद्विषयक अहवालावरून सर्वांस कळून येतील. त्याचप्रमाणे कार्यकारीमंडळ व नियामकमंडळ यांच्या सभा ता. २४ व २८ रोजीं झाल्या. त्यांचे वृत्तांत सोबत जोडले आहेत त्यांवरूनहि त्याचा बोध होईल.

* * *

नागपूर संमेलनाचे अनेक विशेष सांगतां येतील. त्या सर्वांत नागपूर विद्यापीठाचे कुलगुरु श्री. भवानीशंकर नियोगी हे स्वागताध्यक्ष लाभले हा मुख्य होय ह्यांत शंका नाही. कुलगुरूच संमेलनाचे पुढारी बनल्याने विद्यापीठांतील अध्यापकवर्ग संमेलनासाठी कसून मेहनत करीत होता हें जसें व्हावें तसेंच झालें. त्यांतल्यात्यांत शास्त्र-शाखेंतील अध्यापकवर्ग मोठ्या उत्साहाने सर्व प्रकारचें साहाय्य संमेलनास देत होता हें पाहून पुण्यामुंबईकडील मंडळींस तरी जरा आश्चर्य वाटल्यावांचून राहिलें नसेल. संमेलनासारख्या महोत्सवाला माणूसबळ फार मोठें लागतें. तें नागपुरांत फार मोठ्या प्रमाणांत उपलब्ध झालें आणि लहानथोर अधिकारी, व्यापारी या सर्वांनी झटून संमेलन यशस्वी करण्यासाठी कंबर कसली होती. यामुळे मोठें यश नागपूरकरांच्या पदरीं पडलें.

* * *

या यशस्वी संमेलनांत आमच्या दृष्टीला कांही उणीवाहि दिसल्या. त्याहि आम्ही येथे प्रांजलपणें सांगतों. साधारणपणें आम्हांस असें दिसलें कीं, वऱ्हाडचे लोक अपेक्षेप्रमाणे आले नाहीत. निदान वरवर पाहून आमचा तसा समज झाला. रा. बामणगांवकर, रा. खापर्डे, रा. वामनराव जोशी, रा. वासुदेवराव चिपळूणकर इत्यादि मंडळी कोठे दिसली नाहीत. यवतमाळच्या शारदाश्रमाचे उत्साही कार्यकर्ते रा. यशवंतरावजी हे मात्र नागपुरास येऊन, प्रदर्शन मांडून, हजेरी लावून प्रो. काणे यांच्याप्रमाणे प्राच्यविद्या-परिषदेस हजर राहण्याकरितां बडोद्यास गेले. दुसरी उणीव ठरावाबाबतची सांगतां येईल. स्वागतमंडळाने मांडलेले ठराव थोडे होते आणि लोकांकडूनहि खरे विचार करण्याजोगे ठराव थोडेच आले. अध्यक्ष रा. खाडिलकर यांनी मोकळा वादविवाद करण्याला भय नाही तरी संकोच वाटेल अशी जरा औपचारिक स्वरूपाची पद्धति पहिल्या दिवशीं स्वीकारली. आणि दुसऱ्या दिवशीं एकीकडे काव्यगायन तर एकीकडे विषयमंडळाची बैठक असा अडचणीचा कार्यक्रम ठेविल्यामुळे विषयमंडळाच्या बैठकीला फारच थोडे प्रतिनिधि आले होते. या दुसऱ्या वेळीं रात्रौ १॥ वाजेपर्यंत चर्चा लांबली आणि संकोचाहि कमी वाटला. तथापि ठराव पाठविणारी कित्येक मंडळी गैरहजर असल्याकारणाने पुष्कळ विषय राहून गेले. खादीचा प्रसार आणि कालिदास सोसायटीची

स्थापना असे विषयहि सुचवून देणारी मंडळी आढळून आली. परंतु अखेर ते ठराव प्रत्यक्ष पुढे न आल्यामुळे विषयमंडळाच्या सभेंतील एक गमतीचा प्रसंग टळला! विषयमंडळांत मंजूर झालेल्या ठरावावर बोलणारे वक्ते तेथेंच ठरवितां आले नाहीत, हीहि उणीवच म्हटली पाहिजे.

एका ठरावाच्या अंमलबजावणीसाठी २०० रुपयांची रक्कम नागपूरच्या स्वागत-मंडळानें साहित्यपरिषदेला देण्याचें ठरविलें हा अभिनंदनीय उपक्रम झाला यांत शंका नाही. खर्चाची तजवीज ठरल्याशिवाय बऱ्याचशा ठरावांची अंमलबजावणी होणें दुरापास्त आहे.

---

# नागपूर येथील साहित्यसंमेलनांत मंजूर झालेले ठराव

१ परिषद् व संमेलन ही परस्परांस जबाबदार राहून एका आखीव धोरणानें सहकारपूर्वक वाङ्मयकार्य करतील अशी एखादी व्यवहार्य योजना तयार करण्याची वेळ आली आहे असें या सभेचें मत आहे; म्हणून परिषदेने संमेलनाची व परिषदेची कार्यमर्यादा आखणारी एक घटना तयार करून ती मंजुरीसाठी पुढील संमेलनाच्या बैठकीपुढे सादर करावी अशी या संमेलनाची सूचना आहे. , तें

२ दुय्यम शाळांत संगीताचें शिक्षण देतांना मराठी चिजांचा उपयोग करण्याचा उपक्रम ज्या संस्था करीत आहेत त्यांचें अभिनंदन करून सदर शिक्षण मराठी चिजांच्याच द्वारें सर्वत्र दिलें जावें अशी या सभेची शिफारस आहे.

३ राजकीयदृष्ट्या आक्षेपार्ह म्हणून आतांपर्यंत जप्त झालेल्या पुस्तकांपैकी जीं वाङ्मयदृष्ट्या उत्कृष्ट असतील त्यांवरील जप्ती सरकारनें उठवावी म्हणून परिषदेने पुढील वर्षी जोरानें खटपट करावी अशी या सभेची आग्रहाची विनंती आहे.

४ दक्षिण हैद्राबाद (निजाम-इलाखा) व गोवें प्रांत येथे मराठी भाषेच्या शिक्षणादि बाबतींत असलेले अडथळे दूर होतील अशी खटपट करण्याकरितां खालील गृहस्थांचें शिष्टमंडळ त्या त्या प्रांतांतील अधिकाऱ्यांकडे पाठविण्याची योजना साहित्यपरिषदेने करावी अशी या संमेलनाची विनंती आहे.

(१) सरदार माधवराव वि. किबे, इंदूर, (२) रा. सा. ना. गो. चापेकर, बदलापूर, (३) श्री. वामनराव नाईक, हैद्राबाद, (४) श्री. पांडुरंगराव जोशी, (५) श्री. शांबाराव सरदेसाई, गोवें.

५ (अ) ज्यांची जन्मभाषा मराठी आहे अशा विद्यार्थ्यांचें दुय्यम शिक्षण मराठींतूनच दिलें जावें असें या सभेचें मत आहे.

(आ) विश्वविद्यालयीन शिक्षणाचें मराठी हें एक माध्यम असावें अशी या संमेलनाची शिफारस आहे.

६ बृहन्महाराष्ट्रांत महाराष्ट्रभाषा व संस्कृति यांचें संरक्षण व संवर्धन करणाऱ्या ज्या चळवळी चालू आहेत त्या सर्वांस या संमेलनाचा पाठिंबा आहे. आणि या चळवळींची माहिती महाराष्ट्र-साहित्य-परिषदेने मिळवून महाराष्ट्र–साहित्य–पत्रिकेंत प्रसिद्ध करावी.

७ हिंदी, गुजराथी, कानडी, बंगाली इत्यादि अन्य भारतीय भाषांतील उत्तमोत्तम ग्रंथांशीं मराठी भाषकांचा परिचय व्हावा, तसेंच अशा वाङ्मयाची भाषांतररूपाने मराठींत भर पडावी व मराठी वाङ्मयाचींहि इतर भाषांत रूपांतरें व्हावीं या हेतूने त्या त्या भाषेच्या साहित्यसंस्थांशी दळणवळण ठेवून परस्परसहकार्याने वाङ्मयाची देवघेव करण्याकरिता सदर कार्याची रूपरेषा, नियम वगैरे ठरविण्याकरिता एक मंडळ नेमण्याची सूचना ही सभा करीत आहे व परिषदेने ती योजना पुढील संमेलनास सादर करावी.

८ श्रीमंत श्री सवाई तुकोजीराव महाराज होळकर यांच्या औदार्यामुळे महाराष्ट्र ग्रंथोत्तेजक मंडळ, इंदूर या संस्थेस सन १९१६–३१ अखेर प्रतिवर्षी रुपये २५०० व नंतर रुपये १००० देणगी मिळत असे. ती यंदा १९३३ ऑक्टोबरपासून नव्या काटछाटीच्या धोरणान्वयें बंद करण्यांत आली आहे असें समजतें. श्रीमंत श्री सवाई यशवंतराव महाराज यांच्या नजरेस सदर गोष्ट आली नसावी अशी या संमेलनास खात्री वाटते. तरी श्रीमंत श्री यशवंतराव महाराजांनी वडिलांच्या धोरणास अनुसरून मातृभाषेची सहजासहजी होणारी, परंतु अत्यंत महत्त्वाची सेवा पूर्ववत् चालू ठेवावी अशी या संमेलनाची श्रीमंतांस नम्र विनंती आहे.

९ मराठी भाषेस आन्तरराष्ट्रीय महत्त्व देण्यासाठी मराठी वाङ्मयाचीं इंग्रजींत भाषांतरें करणारी एक संस्था असावी असें या सभेचें मत आहे.

१० महाराष्ट्र-साहित्य-परिषदेचें कार्य कायम स्वरूपांत व्यवस्थित रीतीने अखंड चालविण्यासाठी परिषदेचा कायमनिधि वाढविण्याची खटपट मराठी भाषाभिमान्यांनी नेटाने करणें जरूर आहे असें या सभेचें मत आहे. या कामाला तावडतोब प्रारंभ करावा व संमेलनाने आणि जनतेने उदारपणें साहाय्य करावें अशी या सभेची आग्रहाची विनंती आहे.

११ प्रचलित शिक्षणपद्धतीची पुनर्घटना मातृभाषेच्या द्वारें केली पाहिजे या सर्वसंमत तत्त्वानुसार महाराष्ट्र विद्यापीठाची स्थापना करण्याचे जे अभिनंदनीय प्रयत्न चालले आहेत त्यांबद्दल या संमेलनाची सहानुभूति असून सर्वांनी या कार्याला आर्थिक व इतर साहाय्य करावें अशी या संमेलनाची आग्रहाची विनंती आहे.

( अ ) अजमेर बोर्डाने आपल्या हायस्कूल, व इंटरमीजिएट् परीक्षांस मोडी लिपीचें वाचन व लेखन हा विषय ठेविला आहे. मराठीच्या जुन्या व अत्यंत उपयुक्त लिखाणांचें व लिपीचें अशा रीतीने पुनरुज्जीवन करण्याचा उपक्रम अजमेर बोर्डाने केला ह्याबद्दल हें संमेलन त्याचें गौरवयुक्त अभिनंदन करीत आहे.

( आ ) आग्रा युनिव्हर्सिटीने आपल्या अभ्यासक्रमांत मराठी हा विषय बी. ए. पावेतो ठेवून मराठी बोर्डहि निर्माण केलें आहे. ह्याबद्दल हें संमेलन सदर युनिव्हर्सिटीचें सगौरव अभिनंदन करीत आहे. तसेंच पुढे एक पाऊल टाकून एम्. ए. च्या परीक्षेसहि मराठी हा विषय ठेवावा व उत्तर हिंदुस्थानांतील मराठीभाषकांची सोय तिने करावी अशी या संमेलनाची आग्रहाची विनंती आहे.

( इ ) कै. माधव व्यंकटेश लेले, बी. ए., एल्. सी. ई., ग्वाल्हेर, नारायण कृष्ण गद्रे व गोविंद मल्लिनाथ ठेंगे या प्रसिद्ध साहित्यभक्तांच्या निधनाबद्दल या संमेलनास अत्यंत दुःख होत आहे.

---

# परिषद्वार्ता

पत्रिकेच्या वर्ष ६ अंक ३ मध्ये परिषद्वार्ता (२१-११-३३पर्यंतची) लिहिल्यानंतर ता. २९।११।३३ रोजीं कार्यकारी मंडळाची सभा भरली होती. या सभेंत नागपुरास नियामकमंडळ व परिषद् यांच्या सभापुढे मांडावयाचे अहवाल व हिशेब (जाने. १९३२ ते मार्च १९३३ अखेर ) यांचे खर्डे मंजूर करण्यांत आले व घटनाविषयक दुरुस्त्यांबाबत सूचना तयार करण्याविषयी व त्या नागपुरास नियामकमंडळ व परिषद् यांच्या सभेपुढे ठेवण्याबाबत प्रो. गाडगीळ व प्रो. वाडेकर यांस सांगण्यांत आलें.

ही सभा झाल्यानंतर लवकरच परिषदेच्या येथील कचेरीस संमेलनानिमित्त सुटी देण्यांत येऊन ती सुमारें १५ दिवस तात्पुरती नागपुरास उघडण्यांत आली. यामुळे नागपुरास संमेलनांत व संमेलनाबाहेरहि परिषदेचें बरेंच प्रचारकार्य होऊं शकलें यांत शंका नाही. परिषदेच्या या कार्यांत नागपूरच्या स्वागतमंडळाचें बरेंच साहाय्य झालें याबद्दल परिषद् नागपूरकरांची ऋणी आहे.

ठरल्याप्रमाणे परिषदेच्या नियामक मंडळाची सभा नागपुरास ता.२४।१२।३४ इसवी रोजीं नील सिटी हायस्कूलच्या दिवाणखान्यांत दुपारीं २ वाजतां झाली. प्रो. पां. वा. काणे अध्यक्षस्थानीं होते. अहवाल व हिशेब चर्चेनंतर चिटणिसांच्या खुलाशासह कायम करण्यांत आले. तसेंच प्रो. गाडगीळ व प्रो. वाडेकर यांनी सुचविलेल्या घटनाविषयक दुरुस्त्याहि बहुतेक मान्य करण्यांत आल्या. तसेंच कार्यकारी मंडळाने संलग्न व सहकारी संस्थांकरता तयार केलेले पोटनियमहि मान्य करण्यांत आले. कांही इतरहि चर्चा झाली.

ही सभा आटोपल्यानंतर त्याच दिवशीं सायंकाळीं ५॥ वाजतां त्याच स्थळीं परिषदेचीहि सभा झाली. याहि सभेंत प्रो. पां. वा. काणे अध्यक्षस्थानीं होते. नियामकमंडळाने मंजूर केलेले अहवाल व हिशेब, घटनाविषयक दुरुस्त्या व पोट-

नियम रीतसर मंजूर झाले व किरकोळ चर्चेनंतर सभा तहकूब झाली. ही तहकूब सभा ता. २८-१२-३३ रोजीं त्याच स्थळीं सकाळीं ९ वाजतां भरली होती. या सभेस परिषदेचे अध्यक्ष श्री० सरदार मा. वि. किबे हजर असल्यामुळे रीतसर अध्यक्ष-स्थानीं होते. त्यांनी परिषदेच्या कार्यासंबंधी कार्यकारीमंडळास बऱ्याच उपयुक्त सूचना केल्या. ही सभा बऱ्याच अंशीं चर्चात्मक स्वरूपाची असल्यामुळे तींत बऱ्याच सभा-सदांनी भाग घेतला. ही चर्चा झाल्यानंतर सभा बरखास्त झाली.

खुद्द संमेलनाचें वृत्त इतरत्र संमेलनाच्या चिटणीसांनी याच अंकांत दिलेंच आहे. त्यावरून संमेलन अत्यंत यशस्वी रीतीने पार पडल्याचें दिसून येईल. संमेलन हें परिषदेचेंच कार्य होय व तें अत्यंत चांगल्या रीतीने पार पाडल्याबद्दल नागपूरकर मंडळींचे आभार मानावेत तेवढे थोडेच होतील.

संमेलनांत मंजूर झालेले ठराव अलाहिदा याच अंकांत छापले आहेत त्यांवरून परिषदेच्या दृष्टीने पाहतां या वर्षी संमेलनांत परिषदेच्या कार्याची बरीच प्रगति झाली असें म्हणतां येईल. सर्वांत महत्त्वाची गोष्ट म्हणजे परिषदेच्या स्थैर्यासाठी एक कायम-निधि जमा करण्याची कल्पना खुल्या अधिवेशनांत ठरावाच्या रूपाने मान्य करण्यांत आली; आणि जागच्याजागीं या निधीसाठी दोनसव्वादोन हजारांचे आकडेहि पडले. या कल्पनेस स्वतः भाषण करून चालना देऊन व संमेलनाचें काम थोडें तहकूब करूनहि आकडे जमा करण्यास वाव देऊन संमेलनाच्या अध्यक्षांनी परिषदेचें बरेंच कार्य केलें व संमेलनाच्या प्रतिनिधींनीहि परिषदेस आर्थिक अभिवचनें देऊन परिषदे-बद्दल आपली सहानुभूतीची भावना व्यक्त केली, याबद्दल या सर्वांची परिषद् आभारी आहे. याशिवाय परिषद् व संमेलन यांच्या परस्पर संबंधाबाबत कांही योजना तयार करण्याविषयी परिषदेस विनंती करणारा एक ठरावहि झाला आहे. तसेंच हैद्राबाद, गोवें या भागांतील भाषाविषयक अडचणींची दाद लावण्याबद्दल परिषदेने कांही खट-पट करावी असाहि एक ठराव मंजूर झाला असून त्याच्या अंमलबजावणीकरतां नाग-पूरच्या स्वागतमंडळाने परिषदेला २०० रु० ची देणगीहि जाहीर केली आहे. या व इतर ठरावांबद्दल परिषद् आपलें स्वतःचें निश्चित धोरण लवकरच आखील अशी आशा आहे.

नागपुरास संमेलनप्रसंगीं परिषदेस कांही नवीन सभासद व कांही कायम-निधीसाठी देणग्या यांचा लाभ झाला. त्यांचा तपशील पुढीलप्रमाणेः—

खालील सद्गृहस्थांनी त्यांच्या नांवापुढे उल्लेखिलेल्या रकमा देऊन परिषदेचे हितचिंतक होण्याचें संमेलनांत जाहीर केलें आहे.

(१) श्री० मा.वि.किबे, रु. ३०१. (२) सौ० कमलाबाईसाहेब किबे, रु. २०१.
(३) श्री० भवानीशंकर नियोगी, रु. २०१. (४) श्री० तु. ज. केदार, रु. २०१.

खालील सद्‌गृहस्थांनी परिषदेस त्यांच्या नांवापुढे लिहिलेल्या रकमा कायम-निधीसाठीं देणगी म्हणून देण्याचें संमेलनांत जाहीर केलें आहेः—

| | |
|---|---|
| १ श्री. कृ. प्र. खाडिलकर, मुंबई ५१ | ९ रा. सा. डॉ. परांजपे, नागपूर १० |
| २ " द. आ. तुळजापूरकर, " ५१ | १० प्रो. द. वा. पोतदार, पुणें. ११ |
| ३ डॉ. शं. पु. आघारकर, कलकत्ता ५१ | ११ श्री. दि. र. लेले, सोलापूर ११ |
| ४ रा. सा. अ. वि. खासनीस, जत ५१ | १२ श्री. बाबूराव सावरकर, चांदा १० |
| ५ श्री. ना. गो. चापेकर, बदलापूर २५ | १३ व्यवस्थापक, सुदर्शन प्रेस, नागपूर ५ |
| ६ सौ. ताराबाई कुकडे, नागपूर. २१ | १४ श्री. व्य. महाराष्ट्रीय समाज, मह्रू ५ |
| ७ श्री. जी. एन्. गोडसे, नागपूर २१ | १५ व्य. बृहन्महाराष्ट्र कार्यालय ५ |
| ८ " बाबासाहेब देशपांडे, पुणें २१ | १६ श्री. जानकीबाई लांडे ५ |

खालील सद्‌गृहस्थांनी प्रत्येकीं ५० रु. देऊन परिषदेचे तहाहयात सभासद होण्याचें संमेलनांत जाहीर केलें आहेः—

| | |
|---|---|
| १ श्री. त्र्यं. बा. जोग, अकोला | १३ " रा. पु. जोशी, मुंबई |
| २ " गो. अ. ओगले, नागपूर | १४ प्रो. रा. अ. क्षीरसागर, हैद्राबाद |
| ३ प्रो. स. गो. सोमलवार, उमरावती | १५ श्री. पां. वा. जोशी " |
| ४ प्रो. वा. वि. मिराशी, नागपूर | १६ श्री. म. रा. कानिटकर, मेहकर |
| ५ श्री. स. खं. अळतेकर, कऱ्हाड | १७ " कृ. दा. भालेराव " |
| ६ प्रो. या. मु. पाठक, नागपूर | १८ " स. ना. कुलकर्णी, वर्धा |
| ७ प्रो. शं. दा. पेंडसे, नागपूर | १९ " द. कृ. पारनंदीवार, नागपूर |
| ८ श्री. के. वि. फणसे, सिहोरा | २० सॉ. भा. सी. सुखटणकर, मुंबई |
| ९ सौ. लक्ष्मीबाई चिटणवीस, नागपूर | २१ श्री. शं. श्री. देव, धुळें |
| १० श्री. शिरके, जळगांव | २२ प्रि. ध. रा. गाडगीळ, पुणें |
| ११ " भिसीकर, उमरावती | २३ प्रो. गं. गो. कानेटकर, जबलपूर |
| १२ " वि. द. घाटे, पुणें | |

खालील सद्‌गृहस्थ परिषदेचे तहाहयात सभासद झाले आहेतः—

| | |
|---|---|
| १ डॉ. गं. ल. खिरवाडकर, उज्जयिनी | ७ श्री. वा. गो. मंडपे, " |
| २ प्रो. स. बा. बेलेकर, नागपूर | ८ रा. सा. का. के. मराठे, " |
| ३ रा. ब. ग. ह्. गोखले, छिंदवाडा | ९ प्रो. म. आ. मोघे, " |
| ४ श्री. न. का. मोहगांवकर, नागपूर | १० श्री. द. कृ. मोहनी, " |
| ५ श्री. म. अं. अमरावतकर, " | ११ श्री. चिं. म. चक्रदेव, उमरावती |
| ६ रा. ब. मा. बा. किनखेडे, " | |

खालील गृहस्थ परिषदेचे साधारण सभासद झाले आहेत.

| | |
|---|---|
| १ श्री. रा. ब. गोडबोले, पुणें. | १६ " ग. त्र्यं. माडखोलकर, नागपूर |
| २ " गो. ब. जोशी, " | १७ " श्री. ल. पांढरीपांडे, " |
| ३ " अ. तु. वाळके, उमरावती | १८ " आ. कृ. टेकाडे, " |
| ४ " शि. ह. गोखले, नागपूर | १९ सौ. कुसुमावतीबाई देशपांडे, " |
| ५ डॉ. ना. भा. खरे, " | २० श्री. र. ज. सामंत, ठाणें. |
| ६ श्री. गं. ग. कर्वे, " | २१ " रा. दा. जोग, नागपूर |
| ७ " शं. बा. शास्त्री, " | २२ " ना. वा. केळकर, लष्कर |
| ८ " दि. ब. पंडित, " | २३ " रा. र. सरदेशपांडे, उमरावती |
| ९ " र. दु. जोशी, खानापूर | २४ " स. रा. नारगोलकर, वसई |
| १० " ना. वि. जोशी, भंडारा | २५ सौ. मथुराबाई द्रविड, उमरावती |
| ११ " द. ना. कोठेकर, नागपूर | २६ प्रो. रा. बा. मावळंकर, उमरावती |
| १२ " शं. रा. शेंडे, दिल्ली | २७ श्री. न. रा. पारसनीस, पुणें. |
| १३ " वि. आ. जवजवार, नागपूर | २८ प्रो. रा. ना. दांडेकर, " |
| १४ " वा. ह. घारपुरे, मलकापूर | २९ प्रो. वा. वि. मिराशी, नागपूर |
| १५ " रा. ग. प्रधान, नाशीक | ३० श्री. त्रिं. बा. जोग, अकोला |

परिषदेची आजतागायत दुरुस्त्या सामील केलेली घटना छापली जात असून तिच्या प्रति सभासदांस पुढील अंकाबरोबर मिळतील.

ता. १६-१-१९३४.

---

# रद्दींतील रत्नें

जुन्या काळचा इतिहास कळण्यासाठी ज्याप्रमाणे जुन्या कागदांची रद्दी चाळून चाळून त्यांतून उपयुक्त माहितीची जुळवाजुळव करावी लागते तोच प्रकार गेल्या शतकांतील आपल्या महाराष्ट्राच्या इतिहासाविषयींहि करणें भाग आहे. गेल्याच्या मागील शतकांत मुद्रणकला नव्हती. आणि या गेल्या शतकांत तिची स्थापना भारतवर्षांत होऊन ती पुष्कळ वाढीस लागली हें जरी खरें आहे आणि या मुद्रणसाधनांमुळे या काळाविषयी माहिती देणारीं साधनें जरी सापेक्षतेने मागील शतकापेक्षा अधिक उपलब्ध आहेत, तरीदेखील आजचें आपलें गतशतकाविषयींचें ज्ञान फारच अल्प आहे असें म्हणावें लागेल. एकंदरींत एवढें खरें की, जगाची धाव किंवा हाव कितीहि वाढली तरी काळाच्या घोडदौडीमुळे उडणारी विचारसरणीची धूळ गत सृष्टीवर असें दाट छत उभारीत जाते की, कितीहि झाडणेंझटकणें केलें तरी तें पुरें पड-

तच नाही. ' पुढे पाठ, मागे सपाट ' करणाऱ्या पोराची अवस्था आपली कांही एका-एकी सुटत नाही.

गेल्या शंभर वर्षांत आपल्या महाराष्ट्रांत काय काय घडामोडी झाल्या, कोण-कोणते कर्ते पुरुष झाले, त्यांनी उद्योग काय कसे केले, त्या उद्योगांची पुढे काय वाट झाली इत्यादि शेंकडों प्रश्नांविषयी आज फारच त्रोटक माहिती आपणांस आहे.

त्या वेळचीं छापलेलीं वर्तमानपत्रें किंवा मासिकें अथवा ग्रंथ आज पाहावयाचे म्हटलें तर मोठ्या प्रयासाने मुंबई ग्रंथसंग्रहालयांत किंवा ठाणे ग्रंथसंग्रहालयांत थोडेफार दृष्टीस पडतात. बाकी सर्व बुडाले म्हणाना. इतकें कशाला ? सुप्रसिद्ध पंडिती कोश अथवा महाराष्ट्रभाषाकोश इ. स. १८२९ त छापून झाला तो आतां कोणास ठाऊक नाही म्हणून अव्वल इंग्रजींतच दादोबा पांडुरंग यांना दुःखोद्गार काढावे लागले ! एवढी निबंधमाला; पण तिचे ८४ अंक एकत्र बांधलेले फारच थोड्या ठिकाणीं आढ-ळतात. मोठमोठे लोकप्रिय ग्रंथ व मासिकें यांची ही कथा, मग वर्तमानपत्रांना कोण विचारतो ? ज्ञानप्रकाश वर्तमानपत्राच्या गांठी ( फायली ) परवां दुर्दैवाने जळून गेल्या ! केवढें माहितीचें भांडार नाहींसें झालें ! ज्ञानोदय पत्र आज ८५ वर्षांवरचें जुनें; परंतु त्याच्याहि वर्षवार गांठी कोठे सर्व आढळत नाहीत. एवढा मशहूर ' केसरी ' ना, पण त्याच्या तरी फायली किती ठिकाणीं महाराष्ट्रांत आहेत ? दहावीस स्थळीं तरी असले संग्रह बीजरूपाने राहिले तर काळाच्या सपाट्यांतून आपली मान आणखी शेंपन्नास वर्षें वांचवितील. इंग्रजी पत्रांची तीच रडकथा आहे. जसे अव्वल इंग्रजींतले प्रभाकर, धूमकेतू हे आतां अदृश्य आहेत तसेंच कूरिअर, ग्याझेटसुद्धा बहुतेक त्याच पंथांत आहेत.

एका अर्थीं जशीं जुनीं वस्त्रें आपण टाकतों तशींच हीं पत्रें, मासिकें, पुस्तकें-सुद्धा आपल्या विचारव्यापाराचीं वस्त्रेंच होत. तीं जीर्ण झालीं म्हणजे टाकणेंच युक्त आहे. जुनीं उगाच जमवीत बसलों तर तीं जगाची जागा अडवून टाकतील. आणि नव्यांना उभें राहूं देणार नाहीत. काळाची रानतोड चाललेली असते ती एका दृष्टीने हिता-वहच असते. परंतु असेंहि एक पाहिलें पाहिजे की, जुनीं जीर्ण फाटकीं अतएव निरुपयोगी वस्त्रें टाकावीं हें ठीक. परंतु पागोटें फाटलें म्हणून टाकलें तरी कडेचा जर सहजच दीर्घायुषी असतो; तो फेकून देणें लाभाचें नाही. धोतरें दरसाल बदलावीं लागलीं तरी पीतांबर, पैठण्या तशा फेंकून देतां येत नाहीत. त्या इतक्या स्वस्त नस-तात आणि लवकर विटतहि नाहीत किंवा विरतहि नाहींत. मग त्याच हिशेबाने जुन्या वर्तमानपत्री किंवा मासिकी किंवा पुस्तकी लिखाणांतील टाकाऊ भाग नष्ट होऊं दिला तरी जो सत्त्वांश आपल्या प्रगतीला कारण होणारा असतो तेवढा जगवावयालाच हवा. तात्पर्य, वस्तु झाडूवाल्याच्या स्वाधीन करण्यापूर्वी एकदा तरी ती झारेकऱ्याला दाखविली पाहिजे. आणि नमुना म्हणून एकेकाचा एकएक मासला ठेवणें अवश्य आहे आणि तें कांही एवढें जड जाणार नाही. याच नजरेने युरोपीय लोक मोठमोठाल्या ग्रंथसंग्र-

हालयांतून वर्तमानपत्री–मासिकी–वगैरे फुटकळ वाङ्मयाचीं पुस्तकें वाङ्मयाबरोबरच नमुन्यासाठी संगृहीत करितात. मुद्रितांप्रमाणेच अमुद्रित साहित्यहि जतन करून ठेवण्यास ते चुकत नाहीत.

आपल्या देशांत अद्यापि सुशिक्षणाचा प्रभाव असावा तेवढा बलिष्ठ नाही. त्यामुळे या प्राचीन साहित्यसंग्रहणाच्या कार्याचें महत्त्व समजून व्हावे ते प्रयत्न होत नाहीत. परकीय सरकार आहे तें जाणिक आहे. म्हटलें तर मायिकसुद्धा आहे; परंतु मायाळू मात्र नाही. त्यामुळे हीं कार्यें उठावाने आणि धडाडीने होऊन येत नाहीत. हीं आपलीं कार्यें आता आपणच केलीं पाहिजेत आणि आपला संसार जमेल तसा आपणच रेटला पाहिजे. किंबहुना, त्यांतच पुरुषार्थ आहे.

आम्ही जुनीं वर्तमानपत्रें, मासिकें, पुस्तकें अशा जीर्ण साहित्याचा बराच संग्रह केला आहे आणि फुरसतीने हा गळाठा चाळून चाळून त्यांतील संग्राह्य भाग आम्ही वाचकांस देण्याचें योजिलें आहे. रद्दींतील रत्नें वाचकांना मोल्वान वाटतील आणि त्यांचीं ते पुनः रद्दी होऊं देणार नाहीत अशी आशा आहे. अधूनमधून हीं रत्नें शक्यतोंवर भरतीच्या जागेच्या कोंदणांत बसवून सादर करूं. अशीं कोणाजवळ आणखी असतील तर त्यांनी तीं संपादकाकडे अवश्य पाठवावीं.

---

## संपादकीय

गेल्या सहा वर्षांत साहित्य-पत्रिकेंत जे विविध प्रकारचे विषय आले तदनुसार विषयवारीप्रमाणे निरनिराळे विभाग करून स्वतंत्र पुस्तकें तयार केलीं आहेत. नुसते अंक संग्रहीं ठेवल्याने जी सोय होत नाही, ती आता हे विभाग ठेवून सहज होईल. प्रत्येक विभागाचें एकेक वाचनीय पुस्तक ग्रंथालयांतून असणें अवश्य आहे,असें आम्हांस वाटतें. तरी आमच्या या सूचनेकडे लोकांचें लक्ष गेल्यास आम्हांस फार संतोष होईल. कै. बाळकृष्ण अनंत भिडे यांच्यासारख्या मार्मिक व व्यासंगी विद्वानाच्या व टीकाकाराच्या लेखणींतून उतरलेला मराठी वाङ्मयाचा मानभावकालाअखेरचा इतिहास हा वरील सहा ग्रंथांपैकीच एक असून तो तर सर्व शाळांत व ग्रंथालयांत असलाच पाहिजे.

\+ + +

या नवीन वर्षापासून पत्रिकेंतील मजकुराची विभागणी आम्ही येणेंप्रमाणे करण्याचें योजिलें आहेः—( १ ) साहित्य व साहित्यिक ( २ ) ग्रंथ व ग्रंथपरामर्ष ( ३ ) शंका, समाधान, चर्चा व प्रश्नोत्तरें— संकीर्ण. ( ४ ) सम्मेलन परिषद् संस्था व मंडळें— वृत्तांतपर.

वरील चार विभागांत पत्रिकेचा सर्व मजकूर वाटला जावा असें आम्हांस वाटतें. साहित्य व साहित्यिक या विभागांत महाराष्ट्रांतील व महाराष्ट्राबाहेर असलेल्या साहित्यिकांचा परिचय, त्यांच्या जीवन-चरित्राविषयी चर्चा, साहित्यविषयक तात्विक प्रश्न इत्यादींचा समावेश होईल. गुर्जर कवीश्वर नर्मद किंवा हिंदी लेखकवर्य महादेव प्रसाद दुवेदी अशा परप्रान्तस्थांचाहि सत्कार या विभागांत होईल. आमचे मित्र फरिश्ता यांचा इकबालवरील लेख या विभागांत या अंकांत आलेलाच आहे. असेच लेख पुरविण्याविषयी तज्ज्ञ मंडळीस आमची विनंती आहे. प्रसिद्ध संशोधक पंडित गौरीशंकर ओझा यांचा सत्तरावीचा उत्सव लौकरच साजरा होणार आहे. त्या निमित्ताने ओझाजींस सन्मानपूर्वक एक ग्रंथ समर्पण व्हावयाचा आहे. तो मंगल प्रसंग उत्कृष्टपणें साजरा व्हावा अशी महाराष्ट्रातर्फे प्रातिनिधिक स्वरूपाची सदिच्छा आम्ही प्रकट करीत आहों. आणि पंडितजींस दीर्घायुरारोग्य लाभावें अशी परमेश्वरास आमची प्रार्थना आहे.

\+ \+ \+

दुसऱ्या विभागांत विशेषेंकरून ग्रंथसमीक्षणें व अभिप्राय समाविष्ट होतील. हे अभिप्राय एकत्र केल्यास सहजासहजीं मराठी वाङ्मयाचा, असंबद्ध असला तरी, एक कच्चा इतिहासच आपणांस मिळेल असें समजण्यास प्रत्यवाय नाही. आम्ही अन्यत्र जी योजना म. सा. पत्रिकेविषयी प्रसिद्ध केली आहे तींत दर्शविल्याप्रमाणे ग्रंथाची यादी हीहि या अभिप्रायांच्या बरोबर असल्यास वाङ्मयाच्या इतिहासकारास केवढें साहाय्य होईल!

\+ \+ \+

वाङ्मयविषयक प्रश्नांविषयीहि विद्वच्चर्चा, शंकासमाधान, पृच्छोत्तरें, चर्चा, खुलासे, अभिनन्दनें, सान्त्वनें इत्यादि विविध विषय या तिसऱ्या संकीर्ण विभागांत येणार असून चवथ्या विभागांत साहित्यपरिषदेच्या चिटणिसांकडून यावयाची प्रसिद्धिपत्रकें, निरनिराळ्या ठिकाणच्या साहित्यसभांचे वृत्तांत, सम्मेलनांच्या हकीकती, ठराव इत्यादि साहित्यविषयक माहिती समाविष्ट होईल.

\+ \+ \+

पत्रिकेच्या धोरणासंबंधाने आम्ही आपले विचार या अंकांत अन्यत्र दिलेले आहेत. ते आमच्या वाचकांनी अवश्य पाहून आम्हांस आपले अभिप्राय कळविण्याची अवश्य कृपा करावी. त्याचप्रमाणे ठिकठिकाणच्या साहित्यसंस्थांनीहि याविषयी खल करून आपले निर्णय आम्हांकडे कळवावे म्हणजे त्या अनुरोधाने पुढील विचार करण्यास परिषदेच्या व पत्रिकेच्या चालकांस बरें पडेल. हे अभिप्राय आमचेकडे चैत्री पौर्णिमेच्या पूर्वी यावे म्हणजे आम्हांस त्यांचा वेळेवर उपयोग होईल.

\+ \+ \+

नागपुरास यंदा ख्रिस्ती मराठी संमेलन भरलें होतें. जागा १८४० हॉट ही होती. अध्यक्ष श्रीमती लक्ष्मीबाई टिळक यांचें भाषण अत्यंत उदार मताचें महाराष्ट्र संस्कृतीला पोषक आणि विचारणीय असें झालें. महाराष्ट्रभाषा आणि महाराष्ट्रवाङ्मय यांचा पाश धर्मादिकांच्या आडकाठी न जुमानतां 'क्ष' किरणांप्रमाणे त्यांच्या पैलांड कसा जाऊं शकतो त्याचें उत्कृष्ट प्रत्यंतर या ख्रिस्ती-सम्मेलनांत कोणासहि पाहाण्यास मिळेल. हीं ख्रिस्ती संमेलनें यापुढे स्वतंत्रपणें पण साहित्य-सम्मेलनाच्या मंडपांतच जर भरतील तर ऐक्याची भावना अधिक दृढ होईल. या सम्मेलनांतील ठराव थोरल्या साहित्यसंमेलनापुढे रीतसर रीतीने पाठवून त्या सम्मेलनाकडून त्यांस मंजुरी घेण्याची वहिवाट जर आमचे ख्रिस्ती बांधव सुरू करतील तर ते मोठ्या परिषदेचा उत्कृष्ट प्रकारें बोज राखतील, आपल्या कार्यास व्यापक पाठिंबा मिळवितील आणि आपल्या अस्तित्वाची आणि सहकार्याची जाणीव इतरांच्या ठायीं निखालस उत्पन्न करतील. परस्परप्रीतिसंवर्धनाची आम्ही वर दाखविलेली दिशा ही आमच्या ख्रिस्ती बांधवांस पसंत पडेल अशी आम्हांस फार आशा आहे. आणि रा. साळवी, रा. टिळक, रा. उजगरे, रा. सावरकर प्रभृति ख्रिस्ती साहित्यसेवक आमच्या सूचनेचा मनःपूर्वक विचार करतील अशीहि आम्हांस आशा आहे.

\+ + +

अँग्लोइंडियन समाजाचे एक वजनदार पुढारी सर हेन्री गिडने यांची एक मननीय मुलाखत मुंबईच्या 'टाइम्स' काराने घेतली असून तिचा आशय प्रसिद्ध केला आहे. अँग्लो-इंडियन लोकांनी हिंदुस्थान हीच आपली मातृभूमि समजावी असें मशारनिल्हे गिडने यांनी पुनः एकवार आपल्या बांधवांस खणखणीतपणें बजावलें आहे. इतकेंच नव्हे तर, अँग्लो-इंडियन म्हणविणाऱ्या मंडळींनी **आता देशी भाषांचा अभ्यास मनापासून करून** एकमेकांचीं रहस्यें एकमेकांस समजावून दिलीं-घेतलीं पाहिजेत. देशी भाषांचा अभ्यास करण्याच्या कामीं अँग्लो-इंडियन लोकांनी आता दिरंगाई करूं नये हा गिडने यांचा उपदेश बहुमोलाचा आहे.

सर हेन्री गिडने यांनी काढलेले उद्गार येणेंप्रमाणे आहेतः—

"The way to win the hearts of the Indian people is to learn their language. For without this essential factor nothing can be achieved. I am sorry to note that both Anglo-Indian and English women seem to feel ashamed to learn the language of India. It is a short-sighted policy and has done much harm in the past. But if remedied to-day and if our women get to know India and win the hearts of the people, why, India would be a Heaven indeed!"

टाइम्सकारांच्या प्रतिनिधीने सर हेन्री साहेबांची जी मुलाखत घेतली ती पुष्कळच विस्तृत आहे. गिडने साहेबांचा आशय स्वतःच्या शब्दांत त्याने प्रारंभीं पुढीलप्रमाणे दिला आहे. तो तर याहूनहि स्पष्ट व उद्बोधक आहे. तो लिहितो,

" In his opinion *compulsory teaching of the local Vernacular should be enforced in every school.* By this means he hoped to make the future generation conscious of its responsibilities and its position , not as Anglo-Indians and domiciled Europeans but as Indians in every sense of the word. "

*Times of India,*
Jan. 16, 1934.

आमच्या मतें गिडने साहेबांच्या उद्गारांकडे आपल्या सर्व साहित्यभक्तांनीं विशेष लक्ष पुरवून या बाबतींत त्यांचें मुद्दाम अभिनन्दन केलें पाहिजे. अँग्लो-इंडियन या नांवाने ओळखला जाणारा समाज हा सर्वस्वी मनाने व संस्कृतीने हिंदी बनविण्याची खटपट आपण केली पाहिजे. आपल्या शाळांतून, साहित्यसंस्थांतून आणि साहित्य-संमेलनांतून अँग्लो-इंडियन मंडळी दिसूं लागली पाहिजेत, हिंदी म्हणून वागूं लागली पाहिजेत. केवळ त्या समाजावरच हें काम न सोंपविता त्यांनी पुढे केलेला हात प्रेमाने पकडून आपण त्यांना जवळ केलें पाहिजे आणि देशभाषांचें स्वदेशी जीवनामृत त्यांस पाजलें पाहिजे. म्हणजे ज्याप्रमाणे देशी ख्रिस्ती समाज याविषयी बराच जागृत झालेला दिसतो तसाच अँग्लो-इंडियन समाजहि पुढे मागें जागृत झाल्याशिवाय राहाणार नाही. इस्रायेल समाजाबद्दलहि आपणांस असेंच कार्य करावयास पाहिजे आहे. केव्हा तरी अन्य प्रसंगाने यासंबंधाने आम्ही सविस्तर माहिती व विचार प्रसिद्ध करूं.

* * *

मराठी भाषेंतून उच्च प्रकारचें शास्त्रीय शिक्षण देतां येईल किंवा नाही याबद्दल बरेच वेळा शंका प्रदर्शित करण्यांत येते. मुंबई विद्यापीठाने पुणें आणि दक्षिण महाराष्ट्र या टापूंतील कॉलेजांतली तपासणी करण्याकरिता नेमलेल्या तज्ञ मंडळाने आपल्या १९३२-३३ सालच्या अहवालांत असें नमूद केलें आहे की, पुणें येथील सर परशुरामभाऊ कॉलेजांची सर्व अध्यापकांची सभा भरविली असतां भौतिक-शास्त्रांचें उच्च शिक्षण मराठींतून देणें शक्य आहे इतकेंच नव्हे तर तें इष्ट आहे, असा अभिप्राय दिसून आला. हा अभिप्राय फार महत्वाचा असल्यामुळे कमेटींतील तज्ञांचे शब्द आम्ही येथे मुद्दाम उतरून घेऊन वाचकांचे नजरेस आणीत आहों.

" There was another conference with the Principal and the entire staff of the college where the question of teaching of Science subjects in general, through the medium of Marathi was discussed. The general opinion expressed was that not only was this teaching possible, but it was advisable in view of the general demand for education in scientific subjects."

Bombay,
27th Jan. 1933

G. R. Paranjpe
G. Palacios
A. R. Normand.

३३८

कै. राजवाडे यांनी लिहिलेला धातुकोश प्रसिद्ध करण्याची योजना धुळें येथील राजवाडे संशोधन मंदिराने आपल्या हातीं घेतली असून नुकताच औंधचे विद्याप्रिय अधिपति श्रीमंत बाळासाहेब पंडित प्रतिनिधि यांच्या अध्यक्षतेखाली समारंभ करून त्याविषयी निश्चय प्रकट केला गेला. हा कोश बराच मोठा होणार असून यांत सुमारें १७००० धातूंचा संग्रह राजवाडे यांनी केलेला आहे. आपल्या आयुष्याच्या अखेरीचीं कित्येक वर्षें याच कामांत राजवाडे यांनी घालविलीं.

\+ + +

नगर येथील वाङ्मयोपासक मंडळातर्फे आज दोन वर्षें श्रीज्ञानेश्वर-दर्शन नांवाचा जो मोठा ग्रंथ प्रसिद्ध करण्याचें कार्य चालू आहे तें आता बहुतेक संपलें असून मार्च महिन्याच्या अखेरीस मुक्काम नेवासें येथे मोठ्या समारंभाने त्या ग्रंथाचें प्रकाशन होणार आहे. या समारंभाचें अध्यक्षस्थान प्राचीन महाराष्ट्र संतकवींचे रसाळ चरित्र—लेखक ह. भ. प. लक्ष्मणरावजी पांगारकर यांस देण्यांत येणार असल्याचें प्रसिद्ध झालें आहे. रा. ब. आप्पासाहेब देशमूख, रा. टेंभुर्णीकर प्रभृति मंडळींनी या कामीं केलेल्या खटपटीचें अभिनन्दन नेवासें मुक्कामीं जाऊन सर्व साहित्यभक्तांनी करावें, अशी आमची त्यांस विनंती आहे.

* * *

बडोदें येथे भरावयाच्या साहित्य-संमेलनाची पूर्व तयारी सुरू झाली असून श्रीमंत संपतराव गायकवाड यांच्या अध्यक्षतेखाली सहविचारिणी सभेने समित्या वगैरे नेमिल्याचें वृत्त प्रसिद्ध झालें आहे.

## मराठीसाठी एक नवें बक्षिस

एकेकाळीं मराठीचे ' पाणिनी ' म्हटले गेलेले कै. रा. ब. दादोबा पांडुरंग यांच्या नांवाने त्यांचे नातू रा. भास्करराव यांनी मुंबई युनिव्हर्सिटींत दहा हजार रुपये देऊन ठेवलेलें दादोबांच्या नांवचें बक्षिस हें रा. भास्करराव यांस फार भूषणावह आहे. कै. रा. दादोबा यांचें नांव आज कैक पिढ्या महाराष्ट्रांत सर्वतोमुखीं आहे. आतां या बक्षिसाने त्यांचें एक नवें आणि अत्यंत उचित असें स्मारक करण्यांत आलें आहे. असें आनृण्य जोडल्याबद्दल आम्हीं त्यांचें मनापासून अभिनन्दन करितों. सदरहू बक्षिसाची योजना खाली दिली आहे.

"मराठीचे पाणिनी सुप्रसिद्ध व्याकरणकार कै. दादोबा पांडुरंग तर्खडकर यांचें स्मारक करण्यासाठी आमचे सन्मान्य मित्र रा. रा. भास्करराव सदानंद तर्खडकर, जे. पी. यांनी १०७०० रुपयांची रक्कम मुंबई युनिव्हर्सिटीच्या स्वाधीन करण्यासाठी केलेल्या खटपटीबद्दल आम्ही त्यांचें अभिनंदन करतों. या रकमेच्या व्याजांतून दर-वर्षी दादोबांच्या नांवें १४० रु. किंमतीचें एक सुवर्णपदक व २६२ रुपयांचें बक्षिस देण्यांत यावयाचें आहे; मुंबई युनिव्हर्सिटीच्या बी. ए. च्या परीक्षेत ' मराठी ' ऐच्छिक

विषय म्हणून घेऊन पास होणाऱ्या विद्यार्थ्यांत ज्याला सर्वांत जास्त गुण मिळतील, त्याला सुवर्णपदक द्यावयाचें व मुंबई युनिव्हर्सिटीच्या कोणाहि बी. ए. पदवीधराने लिहिलेल्या व कमिटीने सर्वोत्कृष्ट ठरविलेल्या मराठी ग्रंथास २६२ रु. चें रोख बक्षिस द्यावयाचें, अशी ही योजना आहे. सुवर्णपदक मिळविणाऱ्याने एम्. ए. च्या दोन टर्म्स मराठी ऐच्छिक विषय घेऊन भरल्या पाहिजेत, अशी अट घालण्यांत आली आहे. बक्षिसास पात्र ठरणाऱ्या पुस्तकांच्या बाबतींत विषयाचा विशिष्ट निर्बंध घालण्यांत आला नसून तीन इसमांच्या कमिटीने वर्षांतील सर्वोत्कृष्ट ग्रंथ म्हणून शिफारस केलेल्या ग्रंथास तें देण्यांत येईल. कै. दादोबांच्या मातृभाषेवरील प्रेमास अनुरूप असेंच हें स्मारक असून अशा तऱ्हेने दादोबांचें नांव चिरस्थायी करण्यासाठी दादोबांचे नातु रा. भास्करावजी यांनी केलेल्या योजनेबद्दल मराठी भाषाभक्त त्यांना धन्यवादच देतील. "

—विविधवृत्त (२५-२-३४)

अशीं बक्षिसें व्यवस्थेसाठीं साहित्य-परिषदेसारख्या मध्यवर्ती संस्थेच्या हवालीं करणें हें आम्हांस अत्यंत पसंत आहे. भोजराज बक्षिस, चिपळूणकर बक्षिस, भानू बक्षिस इत्यादि जीं बक्षिसें निरनिराळ्या नियंत्रणांत आहेत तीं साहित्य-परिषदेच्या सल्लामसलतीने जर वाटलीं जातील तर आजच्यापेक्षा अधिक फायदा होईल.

भावी महाराष्ट्र-विद्यापीठाला अशा बक्षिसांचा वारसा मिळण्याची व्यवस्थाहि करून ठेवण्यांत आमच्या मतें जास्ती औचित्य आहे.

---

# रद्दींतील रत्नें

रत्न २ शोधक-संपादक

## धर्माचें रक्षण

ज्ञानोदय, १५–६–५३.

मोठें मोठें आश्चर्य ! पुण्यांतील परंतु हल्लीं सुरत जिल्ह्यांतील आपले मोरशास्त्री साठे शूद्रोदक वापरूं लागले आहेत. ते म्हणतात या गोष्टीस प्रत्यवाय नाहीं; आणि इकडेस रेलवे कंपनी म्हणत्ये हलालखोरांस आम्ही आपल्या आगीच्या गाडींत अतःपर घेणार नाही ही तर मोठीच उलट झाली आहे.

# मृत्युलेख

मागील अंकीं रा० माधवराव लेले यांचा मृत्युलेख लिहिला आणि या अंकांत त्यांच्याच पिढींतील रा. परशुराम गोविंद चिंचाळकर ऊर्फ 'गोविंदसुत' यांच्या मृत्यूची दुःखद वार्ता नमूद करावी लागत आहे. गोविंदसुतांचे लेख 'मुमुक्षु' मासिकाच्या द्वारें प्रथमतः प्रसिद्ध झाले. त्यांच्या ठिकाणीं अनेक वर्षांच्या अभ्यासानें दासबोध व ज्ञानेश्वरी हीं ठसावलेलीं होतीं. आणि हा ठसा त्यांच्या लेखांत सुंदर रीतीनें दृष्टोत्पत्तीस येतो. पाहिलें तर केवळ मराठी शिक्षण झालेले हे गृहस्थ. ना संस्कृत ना इंग्रजी विद्येचा अभ्यास घडलेला. सत्पुरुषांची सेवा मात्र वांट्यास आलेली. सांप्रदायिकदृष्ट्या अवश्य असणाऱ्या खुणेच्या ओंव्या राजवाड्यांच्या ज्ञानेश्वरीच्या प्रतींत सापडतात, सबब ती अधिक प्रमाण होय असें आपलें मत असल्याचें ते आम्हांस सांगत असत. नाना प्रकारचे दृष्टांत आणि हरदासी तऱ्हेच्या गोष्टी यांचा फार मोठा सांठा त्यांच्याजवळ असे. त्यामुळे सहजसुंदर मराठी भाषेंत संतकवींच्या खोंचदार शब्दांनी आणि उक्तींनी नटविलेले असे त्यांचे लेख वाचण्यास मनास फार उल्हास वाटे. ते कलेक्टर कचेरींतील मोठे मुरब्बी कारकून म्हणून नाणावलेले होते. त्यांची दृष्टी फार तरतरीत आणि जिज्ञासा फार जागृत असे. यामुळे आधुनिक वर्तमानपत्रें, मासिकें यांवरून आपली दृष्टि नियमाने फिरवून आधुनिक जगाचें चालचलाऊ ज्ञानहि त्यांनी बरेंच संपादिलें होतें. ज्योतिषहि त्यांस चांगलें समजत असे. पुण्यास कै० प्रो. शिवरामपंत परांजपे, चित्रशाळेचे श्री. वासुदेवराव जोशी, मुमुक्षुकर्ते पांगारकर, मनोरंजनामोदकर्ते बाबुराव भिडे इत्यादि मंडळींच्या संगतींत त्यांचा विश्रांतिकाल जात असे. त्यांचे सर्व चिरंजीव सुविद्य आणि पदवीधर असे असल्याने एका प्रकारें त्यांस स्वास्थ्य लाभलें होतें. हा स्वास्थ्याचा काळ त्यांनी 'आत्मानुसंधान', 'आधिभौतिक सुधारणा व आध्यात्मिक जग' अशांसारख्या विषयांवर लेख लिहून व ग्रंथ प्रसिद्ध करून सुखानंदांत काढला. चार मंडळींत बसले असतां ते आपल्या विनोदांनी आणि गोष्टींनी संभाषणास फार चांगला रंग भरीत. त्यांची अस्खलित आणि मनोरंजक लेखनशैली ही शुद्ध मराठी वळणाची, ठसठशीत अशी होती. आणि विचाराचा एकांगीपणा आणि प्रतिपादनाचा पाल्हाळिकपणा त्यांनी काढून टाकला असता तर त्यांचा दर्जा आजहि लावतां येतो त्याच्यापेक्षा फार उंच लावतां आला असता. त्यांच्यावेळच्या पिढींतील मंडळींनी गोविंदसुतांचा कित्ता आपल्या मनासमोर ठेवून मराठी वाङ्मयाची सेवा केली तर त्यांना खरोखरीच धन्यवाद मिळाल्याशिवाय राहणार नाही.

* * *

नुकताच पं. नरहर रामचंद्र गडबोले यांचाहि दुःखद अंत पुण्यास झाला. हे बरींच वर्षें शिक्षक होते. आणि ख्रिस्ती मिशनऱ्यांना मराठी शिकवीत म्हणून यांस पंडित म्हणत असत. अलीकडे सुमारें ८।१० वर्षें मराठी संतवाङ्मयाचे उदार अमेरिकन उपासक जस्टिन् इ. ॲबट् यांनी आपले सहकारी म्हणून पंडितजीस नेमलें होतें. तें काम पंडितजींनी उत्तम तऱ्हेने करून ॲबट् यांचा संतोष संपादन केला होता. रा. गडबोले यांची दृष्टि शोधक होती. आणि मराठीचें इंग्रजी करण्यांतहि ते कुशल होते. पुण्यांतील नूतन मराठी विद्यालयांतहि त्यांनी कांही दिवस काम केलें होतें आणि तेव्हापासून त्यांचा आमचा संबंध होता. ॲबट् यांच्या मागोमाग पंडितजीहि गेल्या कारणाने ॲबट् साहेबांनी आरंभिलेलें महाराष्ट्र-संत-वाङ्मय-परिचयाचें कार्य पुढे चालण्याच्या कामीं मोठीच अडचण उत्पन्न झाली आहे. तथापि रेव्ह. मि. एडवर्डस् यांनीच तें काम आता पुढे चालवावें अशी आमची त्यांस प्रेमाची सूचना आहे.

* * *

आर्यभूषण छापखान्याचे आज कित्येक वर्षांचे व्यवस्थापक रा. केशव महादेव बाळ हेहि नुकतेच दिवंगत झाले. यामुळे मुद्रण-व्यवसायाचा एक एकनिष्ठ सेवक गेला. ज्याप्रमाणे चित्रशाळेचे वासुदेवराव जोशी हे केव्हाहि चित्रशाळेंत उभे असलेले दिसावयाचेच त्याप्रमाणे आर्यभूषणचे केशवराव बाळ हेहि आर्यभूषण छापखान्याच्या आपल्या कचेरीच्या जागीं नेहमी बसलेले आढळावयाचे. उभें गंध लावून, अंगांत जाकिट व सदरा घालून आपल्या जागेवर देवळांतील देवाप्रमाणे बसून शांतपणाने छापखान्यांतील सर्व कामाचा बंदोबस्त करणारी केशवरावजींची मूर्ति आर्यभूषण छापखान्याशीं संबंध आलेल्या कोणाहि व्यक्तीच्या स्मरणांतून जाणें शक्य नाही. एखाद्या संस्थेस सतत एकनिष्ठपणें वाहून घेण्यांत जो थोरपणा असतो त्याचा केशवरावजी हे एक आदर्श होते. एकंदरींत जुन्या पिढींतील अनुभविक व नमुनेदार मंडळी भराभर अस्तंगत होत चालली आहेत हें पाहून खेद झाल्याशिवाय राहात नाही. त्यांची जागा त्वरित कशी भरून निघेल या विचाराने डोकें व्याप्त होऊन जातें.

# नियामक मंडळ

## (१) अधिकारपरत्वें सभासद

१ श्री. स. मा. वि. किबे, (अध्यक्ष), इंदूर
२ प्रो. वा. म. जोशी, (उपाध्यक्ष), पुणें
३ श्री. न. चिं. केळकर, ( ,, ), पुणें
४ प्रो. पां. वा. काणे, (उपाध्यक्ष), मुंबई
५ श्री. चिं. वि. वैद्य, ( ,, ), मुंबई
६ श्री. श्री. कृ. कोल्हटकर (,,), जळगांव

## (२) स्वीकृत सभासद

७ श्री. चिं. ग. कर्वे, पुणें
८ प्रो. दे. द. वाडेकर, पुणें
९ प्रि. ध. रा. गाडगीळ, पुणें
१० प्रो. रा. श्री. जोग, सांगली
११ श्री. य. रा. दाते, पुणें
१२ प्रो. दा. ग. पाध्ये, नाशिक
१३ प्रि. प्र. के. अत्रे, पुणें
१४ श्री. रा. दा. देसाई, पुणें
१५ श्री. रा. ग. हर्षे, पुणें
१६ श्री. द. अ. तुळजापूरकर, मुंबई

## (३) प्रादेशिक सभासद

१७ रे. भा. कृ. उजगरे, सासवड
१८ श्री. शं. वा. किर्लोस्कर, किर्लोस्करवाडी
१९ श्री. वि. द. घाटे, अहमदाबाद
२० श्री. नी. शं. नवरे, सोलापूर
२१ श्री. दे. ना. टिळक, नाशिक
२२ श्री. वा. ना. फडणीस, जळगांव
२३ श्री. शं. श्री. देव, धुळें
२४ श्री. ना. गो. चापेकर, बदलापूर
२५ श्री. ज. वि. लेले, अलिबाग
२६ श्री. र. कृ. पाटणकर, राजापूर
२७ श्री. कृ. पां. कुलकर्णी, सातारा
२८ प्रो. द. वा. पोतदार, पुणें
२९ प्रो. वा. गो. मायदेव, पुणें
३० श्री. शं. के. कानेटकर, फलटण
३१ श्री. श्री. दा. सातवळेकर, औंध
३२ श्री. ना. म. भिडे, भोर
३३ श्री. कृ. प्र. खाडिलकर, मुंबई
३४ श्री. ज. र. घारपुरे, मुंबई
३५ श्री. गं. दे. खानोलकर, मुंबई
३६ श्री. के. ना. काळे, मुंबई
३७ श्री. वा. ल. चिपळूणकर, अकोला
३८ डॉ. भा. म. टेंबे, यवतमाळ
३९ श्री. बा. ग. खापर्डे, उमरावती
४० श्री. या. मा. काळे, बुलढाणा
४१ प्रो. शं. दा. पेंडसे, नागपूर
४२ प्रो. श्री. ना. बनहट्टी, नागपूर
४३ प्रो. ना. के. बेहेरे, नागपूर
४४ श्री. के. वि. फणसे, सिहोरा
४५ श्री. गो. अ. ओगले, नागपूर
४६ श्री. दे. ल. महाजन, नांदेड
४७ श्री. का. सी. वैद्य, हैद्राबाद
४८ श्री. त्रिंबकराजा बहादुर, हैद्राबाद
४९ श्री. पां. वा. जोशी, हैद्राबाद
५० प्रो. श्री. रा. पारसनीस, सातारा
५१ प्रो. मा. त्रिं. पटवर्धन, कोल्हापूर
५२ श्री. गो. शि. उपळेकर, कोल्हापूर
५३ श्री. द. व्यं. पै, मडगांव
५४ डॉ. के. वा. साठे, बेळगांव
५५ श्री. भा. रा. पटवर्धन, धारवाड
५६ दि. ब. अ. बा. लठ्ठे, बेळगांव
५७ प्रो. चिं. वि. जोशी, बडोदें
५८ श्री. ग. वा. मावळणकर, अहमदाबाद
५९ रा. सा. र. लु. जोशी, सुरत
६० सौ. कमलाबाईसाहेब किबे, इंदूर
६१ प्रो. वा. गो. ऊर्ध्वरेषे, इंदूर
६२ श्री. वि. सी. सरवटे, इंदूर
६३ प्रो. गं. गो. कानेटकर, जबलपूर
६४ प्रो. प्र. वा. बापट, ग्वाल्हेर
६५ प्रो. ब. ग. खापर्डे, बनारस
६६ श्री. ग. गं. जांभेकर, पुणें
६७ डॉ. शं. पु. आघारकर, कलकत्ता
६८ सौ. ताराबाई सहस्रबुद्धे, मद्रास

अनुक्रमणिका

# महाराष्ट्र साहित्यांत नवीन उत्कृष्ट भर

## महाराष्ट्र साहित्य पत्रिकेचीं पहिलीं चार वर्षें

अर्थात्

### पत्रिकेच्या अंकांचीं वर्षवार बांधलेलीं चार पुस्तकें

दर पुस्तकांत अभिप्राय, ऐतिहासिक, चरित्र, निबंध, पुस्तकपरीक्षण, भाषिक, शंकाचर्चा, सामाजिक इत्यादि विषयवार सदरें असून, सर्व मिळून महाराष्ट्र-भाषा, वाङ्मय, समाज, इतिहास यासारख्या विविध क्षेत्रांतील नवीन विद्वत्ताप्रचुर विचार आणि माहिती मिळणार आहे.

**भाषिक**—प्राकृत, मराठीचे कालिक व प्रांतिक भेद, म्हणी; पारिभाषिक शब्द; विविध शब्दसंग्रह; व्याकरण; व्युत्पत्ति; लिपी; जुने गद्य–पद्य इ०

**सामाजिक**—जुन्या कथा; गाणीं; सामाजिक टांचणें; खेळ; तोडगे; व्रतें; संस्कारपद्धती; जुन्या चालीरीती; जातींची माहिती इ०

**निबंध**—कृषिशास्त्र; भूघटना; आयुर्वेद; तत्त्वज्ञान; वेद; काव्य इत्यादि विषय.

**ऐतिहासिक**—अलीबहादरांस पत्रें; शिलालेख; शालिवाहन शक; पत्रें; हकीकत तालुके रायगड; पेशवाईच्या सावलींत; बोधले घराणें बखर इ०

**चरित्र**—अश्वघोषाचें बुद्धचरित्र; वि. का. राजवाडे; वि. कों. ओक इ०

**ग्रंथ**—निरुक्ताचें भाषांतर; मराठी वाङ्मयाचा इतिहास; भांडीरभाषा व्याकरण.

**शंकाचर्चाः**—यांत शब्द, वाक्यरचना, प्रचार, व्युत्पत्ति, गाणीं इ. अनेक गोष्टींवर शंकाचर्चा आल्या आहेत.

**पुस्तकपरीक्षणः**—कांही महत्त्वाच्या ग्रंथांवर पांडित्यपूर्ण विस्तृत टीका असून हा भाग परीक्षणक्षेत्रांत अगदी नवीन आहे. मराठी वाङ्मयाचें एक स्वतंत्र दालन यामुळे नवीन उघडलें गेलें आहे.

**किंमतः**—सुंदर कापडी बांधणी विषयसूचीसह. दर वर्षाच्या पुस्तकास ३ रुपये; एकदम पहिल्या चार वर्षांचीं पुस्तकें १० रु. स. ट. ह. निराळा.

**वि. सू.**—पांचव्या वर्षाच्या पुस्तकांच्याहि बांधीव प्रती तयार आहेत. परंतु या प्रतींस प्रत्येकीं ४ रुपये पडतील. ट. ख. वेगळा.

चिटणीस, म. सा. परिषद, पुणें.

---

आर्यसंस्कृति-मुद्रणालय, तिमणबाग, टिळकरस्ता, पुणें येथे लक्ष्मण नारायण चापेकर यांनी छापिलें व पुणें येथे महाराष्ट्र–साहित्य–परिषदेच्या कार्यालयांत (१९६ [७९] सदाशिव पेठ, पुणें २) परिषदेकरिता ना. गो. चापेकर यांनी प्रसिद्ध केलें.